भारत-प्रकाश-ग्रन्थमाला- पुष्प २ रें

# रातराणी

( सोळा गोष्टींचा संग्रह )

—लेखक—

गोपाळ गंगाधर पोतदार

अॅम्. अे. अेल्. टी. (सातारा)

२५ डिसेंबर १९३४

किंमत अेक रुपया

[प्रती २१००]

सविनयानुराग

समर्पण.

प्रिय सुहृद्
राजा खडके
यांस.

# गोष्टींचा अनुक्रम


| | | |
|---|---|---|
| १ | रत्नपारखी (अप्रकाशित) | १– ६ |
| २ | प्रेमसंन्यास ,, .... .... | ७–१४ |
| ३ | अपराधी कोण? ,, .... .... | १५–२१ |
| ४ | रातराणी (कविता–विविधवृत्त खास अंक १९३४) | २२–२३ |
| | रातराणी (गोष्ट–अप्रकाशित) .... | २३–३७ |
| ५ | विमा अेजंट .... .... | ३८–४५ |
| ६ | वेडसर बायको (मनोहर–मार्च १९३४) | ४६–५५ |
| ७ | पुरुषांची जात (मनोहर–जून १९३४) | ५६–६२ |
| ८ | गुन्हेगार (मनोरंजन–फेब्रुवारी १९३४) | ६३–६९ |
| ९ | भुताटकी (विविधवृत्त–ऑक्टोबर १९३४) | ७०–७७ |
| १० | अध्यापिका (विश्ववाणी–जुलै १९३४) | ७८–८५ |
| ११ | देवमाणूस ( ,, ऑक्टोबर १९३४) | ८६–९४ |
| १२ | जन्मठेप (मनोहर–नोव्हेंबर १९३४) | ९५–१०३ |
| १३ | काव्यगायन (अप्रकाशित) | १०४–१०९ |
| १४ | मुलींची शाळा (विहंगम–नोव्हेंबर १९३४) | ११०–११८ |
| १५ | हस्तसामुद्रिक (मनोरंजन–ऑगस्ट १९३४) | ११९–१२६ |
| १६ | घरजांवअी (सत्यकथा–नोव्हे.–डिसें. १९३४) | १२७–१३४ |

# प्रस्तावनेपूर्वी

श्री. गोपाळ गंगाधर पोतदार यांची अनपेक्षितपणें मुंबईहून पुण्यास येतांना विद्युद्रथांत गांठ पडली व लगेच श्री. पोतदार यांनीं मला त्याच्या कथाचा संग्रह प्रकाशनास दिला म्हणून या १६ कथांचा संग्रह प्रसिद्ध करण्याचा सुयोग प्राप्त झाला. कथांच्या गुणदोषांची चर्चा माझ्यासारख्या पुस्तक–विक्रेत्यानें करणें अप्रयोजक व अनपेक्षित होईल. श्री. पोतदारांची व माझी यापूर्वीची विशेष ओळख नसतां त्यांनी मला कथासंग्रह प्रसिद्ध करण्याची संमति दिली याबद्दल मी त्यांचा सदैव ऋणि आहें. असो.

आतां पुस्तकाच्या अंतर्गत व्यवस्थेबद्दल थोडें लिहून प्रिय वाचकांची रजा घेतों. कारण आजचे सुशिक्षित वाचक गोष्टी वाचण्यास अत्यंत अुत्सुक असतात. पहिल्या दोन गोष्टीत अनुच्चारित अनुस्वार काढून टाकले आहेत व सबंध पुस्तकांत अची बाराखडी घातली आहे. हें वाचकांना कितपत रुचेल ते पाहून त्याप्रमाणें पुढील प्रकाशनाची व्यवस्था करण्याचें ठरविले आहे.

२१ डिसेंबर १९३४
३७५ सदाशिव पेठ, पुणें.

श्रीपाद दत्तात्रय वैद्य

# प्रस्तावना

बालरवीच्या तापत्या किरणांनीं सुकूं लागणाऱ्या नाजूक शिरीष कुसुमांचा सौरभ किंवा चौथीच्या चांदाला पाहून फुलूं लागणाऱ्या लाजाळू रातराणीचा सुवास रसिकांना सदैव अुल्हसित करतो.

बागेच्या कोपऱ्यांतील कुंपणावर दरवळणारी शालीन रातराणी आणि चांदणीचौकाच्या कानाकोपऱ्यांतून लुक-लुकणाऱ्या चांदण्या हें रजनीचें वैभव आहे.

दिनमणीच्या झगझगीत प्रकाशांत खुलणारी रंगींबेरंगी विलायती फुलझाडांची बाग मात्र सुवासाच्या दृष्टीनें माळराना-अितकीच रुक्ष वाटते.

रातराणींत गुलाबाचा अुन्मादकारी सुगंधही नाहीं किंवा झेंडूचा भडक रंगही नाहीं.

मनांत अुसळणारे विचार जनांत अुधळून देतांना ते तंत्राच्या ठरीव साच्यांत बसतीलच अशी ग्वाही देतां येत नाहीं.

प्रवासाची आवड आणि वाचनाचें वेड असलेल्या माझ्या-सारख्या हौशी लेखकाच्या लघुकथांचें प्रकाशन अनाहूतपणें केल्याबद्दल मी प्रकाशकांचा आभारी आहें.

सदाफुली स्फूर्ति असणाऱ्या भाग्यवान् लेखकांपैकीं मी नाहीं. प्रसंगस्फूर्त अशा या लघुकथा रसिकांचें रंजन करतील अशी अपेक्षा आहे.

१-१२-१९३४
शशीप्रभा, सातारा.

गो. गं. पोतदार

# १

## रत्नपारखी

'ओ रादर डीअर' हिऱ्याची अंगठी आपल्या नाजूक बोटात चढवून ती म्हणाली.

मंदस्मिताशिवाय मला दुसरे काय अुत्तर देण्याजोगे होते? शेजारच्या फोनोच्या दुकानात अेक अिंग्रजी प्लेट वाजत होती. त्याच्या तालावर तिने अुजव्या पायाचा ठेका हळूच धरला होता. शुभ्र रेशमी स्कर्ट तिच्या गुढग्याशी घोळ घालून बसला होता. बोटातल्या अंगठीकडे पाहत असताना तिचा अुजवा पाय मात्र अगदी कळेल न कळेल अशा रीतीने त्या नर्तनगीताचा ठेका धरीत होता. -

'फिक्स्ड प्राअिस'? हा प्रश्न विचारताना तिचे चंचल व घारे डोळे जरा किलकिले झाले. 'लिप्स्टिक'ने रंगलेले नाजूक ओठ, काखेत धरलेली छोटीशी हँडबॅग, पायमोजाशिवाय असलेल्या अुघड्या व रेखीव पोटऱ्या, तालाच्या झोकात हळूच आवाज करणारा अुंच टाचांचा पांढरा बूट हे मोहक चित्र पाहण्यात मी दंग असल्यामुळे तिने पुन्हा अेकदा प्रश्नाची पुनरावृत्ति केली. 'Yes' या माझ्या अुत्तरावर तिने मंदस्मित करून जरा डोके खाली केले. सोनेरी केसावर ठेवलेली कलती पांढरी हॅट, ब्लाअुजच्या बाहेर डोकावणारा बंडखोर अुरोभाग आणि स्कर्टशी कानगोष्टी करणारा पुष्ट पृष्ठभाग, बसावयास खुर्ची दिली असताहि अुभी असलेली ती अुंच व प्रमाणबद्ध शरीराची तरुण आंग्लयुवती पाहून माझे भान हरपले होते. तिने बोटातून हळूच अंगठी काढली, कारण तिची नजर समोरच्या ढोबळ अक्षरांत लिहिलेल्या 'टर्मस् कॅश' या अक्षरावर ओझरती फिरली. जरा मान लववून माझे आभार मानून ती परत जाण्यासाठी पाठमोरी झाली. हँडबॅग अुघडून आत पाहत ती

म्हणाली : ' Shall come to-morrow ' तिने दुकानाबाहेर जावयास पाअूल अुचलले. तिच्या समोरील मोठया आरशात तिच्या सुंदर चेहऱ्यावर अुमटलेली निराशेची छटा मला दिसली. आपादमस्तक पार्श्वभागावरूनहि माझी नजर निघेना. मी ती अंगठी मखमलीच्या केसमधे घातली व दोन पावले पुढे सरकून म्हणालो :

' Have it ' तिने आश्चर्याने माझ्याकडे सस्मित नजर रोखली. मी अडखळत म्हणालो:

' Send money tomorrow ' तिने आपला नाजुक हात पुढे केला. करतलाच्या किंचित् स्पर्शाने मी रोमांचित झालो. ' Thank you ' अंगठीची भर किंमत मिळाल्याचे समाधान मला झाले. अंगठी बोटात चढवून तिने आपले व्हिजिटकार्ड माझ्या हातात दिले, आणि अैटीत दुकानाच्या पायऱ्या अुतरत अुतरत मागे वळून ती म्हणाली : ' Shall call tomorrow ' ' thanks ' मी मान हलवून संमति दर्शविली. ती मोटारीत बसेपर्यंत मी तिच्याकडे अतृप्त नजरेने पाहत होतो. शेवटी मोटार चालू झाली. कोपऱ्यावरून गाडी वळताना तिने मागच्या काचेतून मजकडे पुन्हा वळून पाहिले. मी अेक दीर्घ निःश्वास टाकला. किती तरी वेळ मी रस्त्याकडे पाहत अुभा होतो व माझ्या कडेला माझे श्वशुर अुभे होते. ते हळूच सस्मिताने म्हणाले : ' terms cash ' मी झटकन् मागे वळलो व माझ्या हातातील व्हिजिटकार्ड पुढे केले.

' अुद्या ती पैसे आणून देअील ' माझी आशा प्रदीप्त होती. बघू या ' त्यांच्या धंदेवाअीक व्यवहारी वृत्तीने अुत्तर दिले.

संध्याकाळी घरी जाताना त्यांनी शोफरला सांगून मोटार कार्ड-वरील पत्त्याच्या अनुरोधाने वाळकेश्वराकडे नेली. दिलेला पत्ता बरोबर होता. बंगल्याच्या पुढील टेनिसकोर्टावर ती सर्विस टाकीत असलेली दिसली. मोटार जरी हळूहळू त्या बंगल्यावरून जात होती तरी मला वाटले की अेकदम मोटारीतून खाली अुडी टाकावी व

तिला खेळताना पोटभर पाहावे. मोटार पुढे गेल्यावर मी मागे वळून पाहत असताना माझे श्वशुर माझ्याकडे पाहून गालातल्या गालात हसत होते. आणि मी रुमालाने तोंड पुसले.

—२—

‘कुबेरान संपत्तीची हाव धरण अप्रस्तुत नाही का ?’ ‘रूपराशी-रतीला वेषभूषेची काय जरूरी ?’ ‘श्रीगजाननान परीक्षेला बसण्याचाच फरक हा’ ‘प्रेमसागराला भरती यायला मुखचंद्र पुरेसा नाही का ?’ ते बोलू लागले म्हणजे अस वाटत की आपण नेहमी अैकतच रहाव. स्वारींचा स्वभाव तर अितका प्रेमळ की आमच लग्न होअून आज सहा वर्षं झाली पण कधी अेकदा सुद्धा माझ मन मोडलेल मला आठवत नाही. अगोदर फार बोलायचाच कंटाळा आहे. बहुतेक अुत्तराच काम मंदस्मितावर भाग-वायच. अन् हसताना दात तरी किती छान दिसतात. माझ्या सारखी भाग्यवान् मीच अस मला नेहमी वाटत. आणि घरजावअी म्हणून बाबाहि त्यांना फार प्रेमान वागवितात. पण मला अस का बर वाटल? मी त्यांना आवडत नसेन का? त्यांना जेव्हा जेव्हा मी चित्र काढताना पाहते तेव्हा तेव्हा त्यांच्या हातून अुंच व सुंदर स्त्रियांची चित्र रेखाटली जातात. आणि मी अुंच मुळीच नाही. कदाचित् फार ठेंगूहि नसेन. परवा त्यांच्या खोलीत मी अेका नव्या अुंच स्त्रीचा फोटो पाहिला. ती आर्यमहिला नसून आंग्लयुवती होती. किती पण प्रमाणबद्ध अवयव आणि मुख तरी किती मोहक! मी जर अितकी मोहित झाले तर ते तर काय पुरुषच! तेव्हापासून मी त्यांच्या वर्तनात काही फेरबदल होतो की काय ते बारकाअीने पाहू लागले. पण काही पत्ता लागेना. आज पहाटे मी अेकाअेकी जागी झाले तो शय्या रिकामी. माझ्या काळजात धस्स झाल. मी हळूच अुठले व त्यांच्या खोलीकडे गेले. त्यांच्यासमोर त्या सुंदर आंग्लयुवतीचा

फोटो व त्याला फिनिशिंग टचेस् देण चाल्ल होत. काम करताना ते गुणगुणत होते. 'प्रेम लाभे प्रेमळाला, त्याग ही त्याची कसोटी' ते परत शय्यागृहाकडे वळण्यापूर्वीच मी बिछाना गाठला. कोणाहि पुरुषाला लोभनीय वाटेल असे तिचे रूप होते. पण माझ्याशी वागताना मात्र कधी तुसडेपणा दिसला नाही. प्रेमसागराला नेहमी भरतीच येओ. 'किती छान चित्र आहे हे! अन् छान माणसच छान चित्र काढतात बर का' ते नुसते हसले व म्हणाले: 'या स्त्रीची तू अेकदा ओळख करून घे. हा तिचा पत्ता.' ओळख करून घेण्याजोगी आहे नाही? 'कशाला?' मी साशंक विचारले.

'अशा संशयी दृष्टीन काय पहातेस? चंद्रिका सुंदर असली म्हणून घरातला मुखचंद्र कोणाला नकोसा होतो की काय? सिनेमातील नटी सुदर असली म्हणून संसार नाटकातील आपली नटी कोणाहि सूत्रधाराने टाकली आहे काय? रविवर्म्याची सुंदर चित्र पाहिली म्हणजे चित्रासारखी आपली सहचरी कोण दूर करील? काव्यातील नायिका संसारातील गृहलक्ष्मीला कधीच डोअीजड होत नाही. रसिकता आणि कामुकता भिन्न असतात. मला हसताना पाहून म्हणाले:

'हिच नांव रोज. पण कंटकांनी ती वेष्टिलेली आहे अशी मला शंका आहे. हिची सर्व माहिती काढून मला सांगशील ना?'

'हो अवश्य.'

## —३—

दुकानात ऑल्फरेडने त्यांना बोलावण्यात गुंतविलेसे पाहून त्यांची नजर चुकवून मी तो हिरा तर माझ्या ब्लाअूजमधे दडपलाच. मला कोणीहि पाहिले नाही व मी त्या मोठया आरशात स्वतःचे प्रतिबिंब पाहत अैटीत अुभी होते. त्यांचाही सौदा पटला व आम्ही मोटारीत जाअून बसलो. त्यांची नजर माझ्यावर लागलेली पाहून मला भीतिहि वाटली नाही. कारण, काहीअेक न बोलता नुसते

. त्याकडे टक लावून पाहण्याची त्यांना सवयच होती. मोटार चालू करण्याबद्दल मी शोफरला खुणविले.

'Usual time, त्यांनी हळूच विचारले. 'O. K.' मी अुत्तर दिले व मोटार चालू झाली. मी दिसेपर्यंत ते मोटारीकडे पाहत अुभे होते. ज्या मौल्यवान् हिऱ्यासाठी आज अितके दिवस आम्ही खटपट करीत होतो तो हाती लागला. कारण, माझ्या सौन्दर्यावर मोहित होअून त्यांनी माझा हळूहळू दृढ परिचय करून घेतला होता व त्याचा आम्ही फायदाहि घेतला. ते अुत्तम चितारी आहेत हे पाहून फार कौतुक वाटले. पण त्यांचे वर्तन अत्यंत शुद्ध असल्यामुळे त्यांच्याबद्दलचा माझा आदर दुणावला. त्या रात्री ते आल्यावर त्यांना पळवून अज्ञात स्थळी दूर नेण्याचा कट मात्र मला मुळीच पसंत पडला नाही. सासरा घरजावयास सोडविण्यासाठी वाटेल तेवढी मोठी रक्कम देअील अशा सद्‌गृस्थास परतविणे माझ्या जिवावर आले. पण माझे कोण अैकणार? रोजच्यापेक्षा आज ते जरा लौकरच आले. माझ्या शिवाय अितरांनी त्यांची कुचेष्टा करावयास आरंभ केला. पण ते मुळीच चिडले नाहीत. आपल्या सवयीप्रमाणे हसत हसत माझ्यापाशी बोलत होते. घड्याळात दहाचे ठोके पडतांच जॉनने त्यांना सांगितले की दहा हजाराचा चेक देण्याबद्दल पत्र द्या नाही तर अुद्या तुम्हाला पळवून नेअू. शिवाय आम्ही लांबविलेला हिरा तर तुम्हाला माहीतच नाही. माझे अंग थरारले आणि ते हसत खिडकीतून रस्त्याकडे पाहत होते. 'I will save you from this pack of thieves' असे ते मला म्हणताच जॉनने त्यांच्यावर रिव्हाल्व्हर रोखले. मी थरथर कापत होते. अितर त्यांच्यावर जरा गुरगुरू लागले आणि ते मात्र शांत होते. त्यांनी खिशातून टॉर्च काढला व शिटी वाजविली. रस्त्यावर टॉर्चच्या अुजेडात पोलिस जमलेले मला दिसले, त्याबरोबर सर्वांचे धाबे

दणाणले. त्यांनी माझा हात धरला व Good night म्हणून सर्वांच्या समोरून ते शांतपणे दाराकडे वळले. पण तो हिरा मात्र मजजवळ नव्हता म्हणून मी चुळबूळ करीत होते. शेवटी मी त्यांना तो हिरा हातचा जाईल असे सुचविले. ते म्हणाले 'you are a jewel, come along' आम्ही मोटारीत बसलो व ताजमहाल हॉटेलात गेलो. रात्रीच्या कलकत्ता मेलचे त्यांनी मला फर्स्ट क्लासचे अेक तिकिट व पाचशे रुपये देअून प्लॅटफॉर्मवर आणून सोडले. आमची टोळी पकडली गेली आणि मी निसटले. पण त्या हिऱ्यासाठी माझा जीव खालीवर होत होता. शेवटी गाडीने शिटी फुंकली. त्यांनी हस्तांदोलन केले. माझ्यामुळे आपला हिरा गेला असे मी म्हणताच ते हसले व म्हणाले : मला अुकिरड्यावर हे रत्न सापडले. पण तो खरा हिरा सेंट्रल बँकेच्या स्ट्राँग रूममधे आहे. मी चोरलेला हिरा नकली होता. मी मनात म्हणाले : खरा रत्नपारखी हाच. प्रेमाने त्यांनी माझ्या हाताचे चुंबन घेतले व गाडी हालली. (अप्रकाशित)

# २

# प्रेमसंन्यास

'बघितलस, काही शिस्त नाही तुला. लाज वाटते मला अशा अजागळ बायकोची. अगदीच बुवा तू केअरलेस'.

'साहेब, प्लीज अेक्सक्यूज.'

'चल, घे त्या भालला. त्यांच टेबलक्लाथ खराब केलन् गाढवान.'

माझे पति घरी जाण्यासाठी अुठले व म्हणाले, 'गुड नाअिट साहेब' अन् साहेब आपले हसत होते! भालला मांडीवर घेअून आपल रिस्टवाच त्याच्या हातात देअून त्यांनी विचारल: 'कुठ चाललास अितक्या लौकर? बैस. अन् माधव, अितरांच्या समोर सुद्धा तू वहिनींना बोलतोस? अरे त्यांच्या मनाची, त्यांना काय वाटत असेल याची काही कल्पना! होअू दे खराब झाल तर टेबल-क्लाथ. दुसर घालता येअील. पण वेड्या, वहिनींच्या मनावर तू केलेला आघात बरा होअील का लौकर? माग, माझ्यासमोर त्यांची क्षमा माग अगोदर. अन् भाल तो केवढा! बर त्यात कसली आली आहे शिस्त! माधव, मढी फाडावीस तू. तुला अंत:करण काय जोडता येणार?' ते बोलू लागले म्हणजे मला त्यांच्याकडे पाहावस वाटे. माझे पति अगदी चूप बसले होते. अन् भालला ते घड्याळ दाखवीत त्याच्याशी खेळत होते त्यांनी घंटा वाजवून म्हटले: 'जानकीनाथ, डॉक्टरसाबकू पान ले आव' ते अितके म्हणत आहेत तोच आमच्या भालन हातातल रिस्टवाच ताडदिशी फरशीवर टाकल आणि ते फुटल. झाल, माझे पति ताड-

दिशी जागेवर अुठून अुभे राहिले आणि ओरडून म्हणाले: ‘ भाल्या, गाढवा, त्यांच रिस्टवाच फोडलस. कहर झाला आता अगदी. चल ग, आता तरी घरी. पोरांना वळण नाही,‘शिस्त नाही, काही नाही.’ मला अगदी मेल्याहून मेल्यासारख झाल. मला हा अनुभव रोजचाच आहे. हे शिस्तीच व्याख्यान सुद्धा आणखी कितीतरी वाढल असत. पण मधेच साहेब म्हणाले :

‘हो, हो, जरा थांब. अगदी अजब आहेस तूं माधव.’

‘पण, साहेब, त्या मूर्खान चांगल सोन्यासारख घड्याळ फोडल ना ?’

‘ बरं मग ? फोडू देत. घड्याळ सोन्यासारख, अन् पोर सोन्यासारख नाहीं वाटत ? यू आर सिपली ॲन ॲस. माधव, आता भालला दटावण पुरे. जानकी, या सर्व काचा गोळा करून येथून केर काढून घे. ’ काच फुटलेल घड्याळ पुन्हा भालच्या हातांत देअून ते म्हणाले : ‘ रडू नको ह भाल. तुझा बाप किती अगदी मूर्ख आहे. ’ भाल पुन्हा हसत घड्याळाशी खेळू लागला.

‘ साहेब, धन्य आहे बुवा तुमची. अहो, मला माहित आहे. टेनिस टूर्नामेंटमध्ये मिसेस रोजन स्वतः तुमच्या हातात ते बांधल होत तुम्ही सेट जिकून चॅंपिअन झाला तेव्हा.’

‘ अन् फुटल म्हणून काय बिघडल ? घड्याळाची काच बसवून ते पुन्हा चालूं होअील. पण वहिनींच्या मनाच बंद पडलेल घड्याळ चालू होअील का लौकर ? का भालच्या घड्याळाचा अलार्म तरी थांबेल लौकर ? जरा माणसासारखा वागत जा. तुझ हे शिस्तीच वेड जरा कमी कर. शिस्त म्हणजे काही सर्वस्व नव्हे. ’ ‘ माझ्या दवाखान्यांत अेकदा येअून पहा तर साहेब. कशी जिथली वस्तु तिथ. अगदी स्वच्छ. परवा सिव्हिल सर्जन तर नुसता खूष होअून गेला. ’

‘ म्हणून का बाबा बायकोला नाखूष करतोस. अन् पोरांना दटावतोस ? वहिनीन गायला शिकायचा कारे तुझा आग्रह. त्यांना

काही स्वातंत्र्य आहे की नाही ? हो, बरी आठवण झाली. जानकी, ती नवी रेकार्ड आण पाहू खालून. वहिनी, कालच त्या दुर्गाबाअी खोटयांची पद आली आहेत. ती अैकायची म्हणत होता ना ? ' मी आपली चित्रासारखी तटस्थ बसले होते. माझे पति सिगारेटच्या धुरात गुरफुटले होते. अन् भाल साहेब फोनो लावीत होते तिकडे पाहत होता. आम्ही खोटयांच ते पद ' अजि सुमन लीला आनंद दे ' अैकू लागलो.

' चार्मिंग नाही का डॉक्टर ! अस म्हणून त्यांनी ' बाळा का झोप येअिना ' ही प्लेट लावली. तोच जिन्यावर दणदण पाय वाजवीत त्यांचा मुलगा राजा येअून त्यांच्या खुर्चीजवळ अुभा राहिला आणि माझ्याकडे निरखून पाहू लागला. प्लेट संपल्यावर, साहेबांनी विचारले : ' राजा, कारे आलास बाळ ? झालं का खेळणं ? ' ' नाना, मला वाटलं किनी आपली-' साहेब प्लेट लावण्याच्या नादात म्हणाले— ' काय, बाळ ? '

' मला वाटल आपली माअीच आली. ' ताडदिशी ती प्लेट त्यांच्या हातातून खाली पडली. राजाला पोटाशी धरून अेवढे मोठे साहेब पण त्याच्या बरोबर तेहि रडू लागले. दोनच मिनिट बापाच्या छातीवर डोक घासून तो रडत होता आणि मोठया कष्टान साहेब आपले अश्रू पुशीत होते. ते वादळ हळूहळू ओसरल. मला कौतुक वाटल. काय हे प्रेम !

' जानकी, राजाला मोटारीतून फिरून आणायला सांग पाहू, चांदण कस छान पडल आहे. जा. जरा फिरून ये हं बाळ. माझ्याकडे पाहत पाहत तो मातृविहीन गोड मुलगा तेथून निघून गेला. थोडयाच वेळात साहेबांनी मन आवरल आणि तोंडावर खोट हास्य आणून म्हणाले : ' आता कोणती लावू प्लेट, वहिनी? ' मी काय सांगू शकणार होते ? मी काहीच बोलले नाही. नुसती पाहत होते त्यांच्याकडे. 'साहेब, तुम्ही लग्न का करीत नाही पुन्हा ?

का पैसा नाही, का वय नाही ? ' माझ्या पतींनी प्रश्न विचारताच साहेब हसले. ' माधव, परवा आमचा बँकेचा अिन्स्पेक्टर आला होता तपासणीला. त्यान सांगितल की तुला चार हजाराच नव फर्निचर पाठवून देतो. अर्ज कर '

' अरे वा ! चैन आहे बुवा ! माझे पति म्हणाले.

' मी अर्ज केला कीं, माझ्यासारख्या विरक्त विधुराला करायच काय नव फर्निचर. ' असे हेड ऑफिसातल्या लोकांना आश्चर्य वाटेल. कशाला रे हा व्याप माझ्यासारख्या संन्याशाला ? '

' अेकादी सुंदर पदवीधर कुमारी आनंदान लग्न करील तुमच्याशी. '

' अन् मग माझ्या राजाच कस होओील ? अन प्रेम काय अस वाटेल तेव्हा विकत घेता येत होय ? '

साहेबांच्या दिवंगत पत्नीचा फोटो टेबलावर होता तिकडे मी पाहत होते,

माझे पति अुठता अुठता म्हणाले : ' मग आमच्या घरी केव्हा येणार साहेब ? ' ' तुझ शिस्तीच वेड सुटेल तेव्हा. अन् हे बघ, वहिनींना जर अस छळशील तर मग मुळीच येणार नाही बघ. '

भालला घेअून माझे पति मोटारीत बसले. अन् माझा हात धरून साहेबांनी मात्र शेवटच्या पायरीवरून खाली अुतरविल. माझ्या अंगातून विजा चमकल्याचा भास झाला. मी मोटारीत बसताच साहेब म्हणाले :

'देखो, शोफर, धीरे धीरे जाना भीतर लडका है, साबकू तकलीफ नै होना' 'अच्छा, हुजूर' मोटार चालू झाली. रेशमी पोकळ पायजमा, वर रेशमी पोलो कॉलरचा दंडकी वजा शर्ट, डोक्यावर काळ्याकुळकुळीत केसांचा अस्ताव्यस्त पडलेला भांग आणि पायात मद्रासी चप्पल. मी आपली वेड्यासारखी साहेबाकडे पाहत होते.

' गुड नाअिट, डॉक्टर'

' गुड नाअिट साहेब,

मोटार आमच्या घराकडे धावत होती आणि माझे मन साहेबांच्याकडे धावत होते.

—२—

' बर झाल आता चांगली ताळ्यावर येअील ती. अन् या नर्सची शिस्त तर घेण्याजोगी आहे अगदी. अन् सुंदर तरी किती! मलाही तिचा कंटाळा आला होता म्हणा. अन् आश्चर्य आहे माझी बायको आपली त्या साहेबांचे गोडवे गाती. त्याची लेकाची अेथून बदली झाली हेहि बरच झाल. का त्यान बदली करवून घेतली मुद्दाम कुणास ठाअूक? नशीब नाही बेटयाच. अथवा नशीब तरी का नाही? पण अक्कलच नाही. चांगली बँकेची हजार रुपयाची नोकरी! अन् हा राहायाचा आपल्या अेकाद्या संन्याशासारखा. म्हणे प्रेम विकत घेता येत नाही! मी नाही प्रेम घेतल विकत? येथे पाहिजे जातीचे हेच खर. तिच्या आचरटपणाचा तर मला अगदी कंटाळा आला होता. आपली झोपेत साहेब म्हणून मला मिठी मारीत होती! काय त्याच तिला कौतुक? त्याचा फोटो तिच्या जवळ! म्हणे 'साहेब किती प्रेमळ' हो, तिच जर माझ्यावर प्रेमच नाही, तर मी तरी कशाला मुर्वत धरू तिची? चांगली नाकावर टिचून जेव्हा आणली नवी नर्स घरी, तेव्हां अुघडले डोळे. बस्स आता हिची लुगडी तिला धुवायला सांगायची. शिक म्हणाव शिस्त हिच्या हातून आणि राब मोलकरिणीसारखी तिच्या हाताखाली.

' वहिनी,' मी दचकून विचारले: ' या, अगोदर आत या पाहू. ' बाहेर धो धो धो पाअूस कोसळत होता, तुफान वारा अन् विजांचा कडकडाट! मध्य रात्रीच्या वेळी माझा नुकताच डोळा लागला होता. राजाला बोर्डिंगात नुकताच ठेवला होता म्हणून मी बंगल्यांत अेकटाच होतो. चपराशी तर नुसता घोरत होता. अन् घंटा जोरान

खणखणत होती. दार अुघडून पहातो तो वहिनी– माधवाची बायको. मी आश्चर्यचकित झालो त्यांचे कपडे ओलेचिंब झाले होते. थंडीन का भीतीन त्या थरथर कापत होत्या. त्यांना ड्रेसिंगरूम-मधे पाठविले. त्यांना ओल वस्त्र सोडायला सांगितल खर पण, माझ्या घरात लुगड तरी कुठल ? मला अेकदम आठवण झाली· दोन वर्षांपूर्वी ती जी ट्रंक अेकदा लावली होती ती मी आता अुघडली. तिच ते रेशमी पातळ हातात घेतल अन् माझे डोळे पाण्याने भरून आले. कुणाच वस्त्र आज कुणाला देण्याची पाळी आली. त्या हिरव्या पातळानच मी डोळे पुसले आणि बाहेरूनच ती पातळाची घडी आत टाकली. माझा फ्रॉक आत आहेच. अन् स्वेटरहि घाला, थंडी फार पडली आहे बाहेर'. 'हं' अस अुत्तर आल्यावर मी हॉलमधे आलो व आरामखुर्चीवर डोळे झाकून पडलो. माझ मन दोन वर्षांपूर्वीच्या गोड वातावरणात घुटमळत होत, तोच वस्त्र परिवर्तन करून वहिनी पाय न वाजविता माझ्यासमोर येअून अुभ्या राहिल्या. हिरव्या रेशमी पातळावर स्वेटर, ओले केस पुसून पाठीवर सोडलेले, डोळ्यात अश्रू, अन् दृष्टी जमिनीवर खिळलेली. मी त्यांच्या अंगावर शाल टाकली व हळूच म्हटल: 'वहिनी !' त्या मटकन् कोचावर कोसळल्या. मी अुठलो व आत जाअून स्टोव्ह पेटविला आणि कप दीडकप कोको, थोडी बिस्किटस् व फळ टेबलावर ठेवली. त्यांनीहि ती न बोलता घेतली. त्यांचा फराळ संपेपर्यंत मी तावदानातून बाहेरच्या निसर्गाची झुंज पाहत होतो. काळ्याकभिन्न मेघांवर निमिषमात्र वीज कडाडली. पुन्हां पावसाचा धुमाकूळ, वाऱ्याला जोर आलेला आणि माझ्या मनात काय वादळ कमी होते ? मी वळून पाहिल तो वहिनी फराळ संपवून माझ्याकडे पाहत होत्या. 'अेकट्या का आलात वहिनी ?' मी विचारले.

'दुसर कोण येणार माझ्याबरोबर ? '

'का, माधव का नाहीं आला ? '

'अेका नर्सबरोबर दुसर लग्न केलय.'

'काय ? मी ओरडून विचारले.'

'आज सहा महिने झाले मी घरांत राबते मोलकरणीसारखी अन् तिची शिस्त कडक!'

'मग भालला का नाही आणलत बरोबर?' वहिनी ओक्साबोक्शी रडू लागल्या.

'भाल-भाल गेला मला टाकून'

मी ताडदिशी अुठून विचारल 'काय भाल टाकून गेला? केव्हा? अरेरे.'

वहिनी रडत रडत म्हणाल्या: 'त्याला ताप आला म्हणून तिनच त्याला औषध दिल आणि शेवटी माझ पोर जगातन अुठल.'

'वहिनी, वहिनी, अन् माधव? मी अुसळून विचारले. डोळे पुशीत वहिनी म्हणाल्या: 'त्याचं काहीच नाही तिकडे'

'मला का नाही कळवलत ?'

'कस कळवू. अन् काय कळवू ? जिवाला कंटाळून गंगेत अुडी घ्यायला गेले.'

'काय सांगता वहिनी हे ?'

'परमेश्वरसाक्ष खर सांगते.'

'अन् त्या चांडाळणीन माझ्यावर खोटानाटा आळ आणला' रडत रडत वहिनी म्हणाली. 'अन् परवा रात्री धुंदीमधे माझ्या अंगावर त्यांनी हात टाकला. खोलीत कोंडून ठेवल.' मी अुठून दोन तीन फेऱ्या घातल्या. मला माधवाच हे परिवर्तन सहन होअीनास झाल. डोळे पुसून शांतपणे वहिनी म्हणाली.

'संध्याकाळीं दोघेजण सिनेमाला गेली अन् मीहि वाट धरली. काल सकाळपासून मी अुपाशी आहे.'

मी अुठलो. घडयाळाकडे पाहिल तो दोन वाजायला आले होते. ५।। ला अलाहाबाद अेक्सप्रेस होती. चार दिवसाच्या रजेचा अर्ज खरडला. फोनने श्रॉफला जातो असे सांगितले.

दुसऱ्या दिवशी डेक्कन क्वीनमधून अुतरलो व तडक हिंगण्याची वाट धरली. मला सवडहि नव्हतीच. वहिनींना कर्व्यांच्या युनिव्ह्‌सिटीत ठेवले. पैशाची सर्व व्यवस्था केली. आणि गाडी गाठण्यासाठी परत मोटारीत बसलो. वहिनींचे डोळे पाण्यान डबडबले. त्या म्हणाल्या: ‘ अन् मला अिथ करमायच नाही. मी राजाची चांगली निगा राखीन. काय मला शिकून तरी करायचय ? ’

‘ नको, वहिनी, अिथच राहण बर नाही का ? ’

‘ अन् आपण तरी अेकटेच राहणार ना ? ’

‘ माझ नाही मन लागायच इथ. ’

मी अेकदाच वहिनींकड पाहिल. त्यांचा हात माझ्या हातात घेतला व म्हटले:

‘ वहिनी, मी संन्यासी आहे. माझा प्रेमाचा संन्यास आहे, प्रेमासाठी संन्यास नाही.’

मोटार चालू झाली. मी वहिनींला नमस्कार केला. (अप्रकाशित)

# ३

# अपराधी कोण ?

तिची आज सकाळींच लहर लागली होती. वळवाचा पाऊस अन् गायिकेची लहर सारखीच. वळवाच्या पावसानें थोडा वेळ गारीगार वाटलें तरी पुन्हां अुकाडा मात्र जोरावतो. तिच्या गायनाचें असेंच होतें. अेकादे वेळीं अैन मध्यरात्रीला तिच्या गोड गाण्यानें माझी झोंप-मोड होअून मन गाण्यांत रमतें न रमतें तोंच ती एकदम गाणें थांबवी. माझ्या विनंति–अर्जांना वाटाण्याच्या अक्षदा लावण्यांत तिची अेकाद्या जुलुमी सुलतानावरहि ताण होती. स्त्रियांचा नकार होकारार्थी असतो या नियमाला ती तरी अपवाद होती. पहाटें अुठून सुरूं केलेलें चित्र आज संपविण्याची मला गर्दी होती. प्रथम जीवन आणि मग कला. चरितार्थाच्या धंद्याची हेळसांड करून कलेच्या मागें धावण्याइतका श्रीमंत मी नसल्याकारणानें तिचें गाणें केव्हां संपेल याची मी वाट पाहत होतों. ' गोरी धीरे चलो ' हें गोड पद अगदीं धीरे धीरे पण सुरेल आवाजांत ती म्हणत होती.

' आशा, मला आज चित्र संपवावयाचें आहे. '

अितका वेळ ती माझ्या दंडाचा अुशीसारखा उपयोग करून पडल्या पडल्या गात होती. आतां तर तिनें बाहुलतेचा विळखा माझ्या गळ्याभोंवतीं टाकला. आणि तिचें गाणें रंगांत आलें होतें. फलका-वरचें तें निर्जीव चित्र संपविण्याचा नाद सोडून मी त्या सजीव सुंदर चित्राकडे पाहण्यांत तल्लीन झालों होतों.

आकाशाच्या अंगणांत पेटविलेल्या असंख्य दीपमालिकांअैवजीं भूमीवरील विद्युद्दीपाकडेच मांणूस जास्त जिव्हाळ्यानें पाहत नाहीं का ?

## रातराणी

सूर्याच्या कोवळ्या किरणांनीं बिचकत बिचकत प्रवेश केला तरी ती गाण्याच्याच गुंगींत होती. कलेचा नाद संसर्गजन्य असावा; कारण जिन्यावर कोणाचीं तरी पावलें वाजल्याचा भास झाला तरी माझे कान तिच्या गाण्याकडे व भान तिच्याकडे लागलें होतें. जरठ अशा वृक्षांना सुद्धां कोमल वल्लरींचा विळखा सोडून टाकावासा वाटत नाहीं. मग मी तर काय तरुण होतों. हा ब्रम्हानंद कीं काय ? कुणास ठाऊक.

इतक्यांत खाडदिशीं दार अुघडून माझी नूतन परिणीत पत्नी माडीवर आली. आमची दोघांची अेकशय्या होती. निरभ्र अशा आकाशांत वीज चमकलेली पाहून मी तर घाबरलोंच पण आशासुद्धां धडपडून उठली व पदर सावरून अुभी राहिली. अेकवस्त्रा-आशेकडे माझ्या पत्नीनें एक विषारी नजर टाकली. मागून हमालानें ट्रंक-वळकटी आणून ठेवली. मीं त्या हमालाचे मनांतल्या मनांत आभार मानले व त्याची हमाली देण्याचे मिषानें तेथून पाय काढला.

चवताळलेली वाघीण तरी अवमानित पत्नीपेक्षां कमी क्रूर भासेल. सिंहाच्या जबड्यांत अुडी घेणें बरें पण खंडिता कांतेबरोबर भाषणाचा प्रसंग नको असें मला वाटलें. पण नको म्हणून सुटका थोडीच होणार होती ? कडू औषधाचा घोट तोंड वांकडें करून तरी घ्यावाच लागतो. तोंडावर अुसनी बेफिकिरी व खोटें हास्य आणून मी परत आलों.

'अगदीं अनपेक्षित आलीस. निदान पत्र तरी पाठवायचें होतें. म्हणजे स्टेशनवर नसतों कां आलों ? '

'रंगांत भंग केल्याबद्दल मीच क्षमा मागायला पाहिजे. कलावंतांचा विरस करूं नये असा रसिकांचा रिवाज आहे आणि पतिपत्नींची ताटातूट करूं नये असें प्रापंचिकांचा धर्म सांगतो.'

आशा आतां रडायच्या बेतांत आली आहे असें मला वाटलें. पण

तिच्या तोंडाची मुलुखमैदान आशेबरोबर माझ्याहि ठिकऱ्या अुडविणार कीं काय अशी मला भीति वाटूं लागली.

‘ खरं आहे. ’ मी कांहीं तरी बोललों झालें.

‘ होय ना ? ’ माझ्या पत्नीनें आशेकडे रागानें पाहत म्हटलें.

‘ आशा, तुझ्या वहिनीला चहा तरी देणार कीं नाहीं ?’

‘ वहिनीला ? का सवतीला ? ’

विषयांतर करण्याचा माझा प्रयत्न विफल झाला.

‘ हें पहा, तू घरांत पहिलं पाअूल टाकलंस आणि गरजूं लागलीस. ’

‘ गर्जेल तें पडेल काय ? असा आपला समज आहे काय ? ’

‘ माझे आअी, तुला आतां हात जोडतों.– ’

‘ गडकऱ्यांच्या गोकुळावरहि ताण आहे ही.’

मी एका आरामखुर्चीवर धाडकन् अंग टाकलें, आशेचे डोळे पाण्यानें डबडबले होते.

—२—

चार महिन्यांच्या सहवासानेंच मला कळून चुकलें कीं, माझ्या पतींचा स्वभाव फार गोडवा होता. चित्रकलेवर जेमतेम संसार करण्याइतकी त्यांची प्राप्ति होती. पण शालीन स्वभावामुळें स्वतःच्या नावाचा गाजावाजा करून आपली कमाअी वाढविण्याचें व्यावहारिक चातुर्य त्यांचे अंगीं नव्हतें. धंद्याच्या सुरवातीला आशे-कडून त्यांना पैशाची मदत फार झाली होती व म्हणूनच आज त्यांना पोटापुरता पैसा मिळवितां येत होता. माझ्या लग्नानंतर अगदीं अुडत अुडत त्यांचा व आशेचा संबंध माझ्या कानावर येअून आदळला. खऱ्याखोटयाची शहानिशा करण्यासाठीं पहिल्या गाडीनेंच मीं बेळगांव सोडलें व अनपेक्षितपणें मुबईस येअून घरांत पाअूल टाकलें. तो देखावा पाहून मला काय वाटलें असेल बरें ?

मी आल्यावर दुसऱ्याच दिवशीं आशेनें आमचें घर सोडलें. रात्रंदिवस माझे पति घरांत बसून कामांत मग्न असत. एका शब्दानें त्यांनीं मला कधीं दुखविलें नाहीं. आशेचा तर अुल्लेखहि कधीं पुन्हां झाला नाहीं. आशा एका बोलपटांत काम करीत असल्याचें मला माहीत होतें.

घरीं यावयास कधींहि अुशीर न करणारे माझे पतिदेव आज साडेआठानंतर घरीं आले. नेमानें दत्ताची आरति करून जेवण्याचा त्यांचा क्रम होता. पण आज त्यांची म्लान चर्या पाहून माझ्या काळजांत धस्स झालें. आज त्यांचें जेवणहि रोजच्या सारखें झालें नाहीं. रोज शतपावली करीत रामरक्षा संपवून ते झोंपी जात. पण आज त्यांनीं तर जेवतांच बिछाना गांठला. त्यांना झोंप लागलेली पाहतांच मी सहज कोटांतील खिशांत हात घातला. तों काय ? आशानिराशा चित्रपटाचें तिकिट खिशांत. कसे तरी चार घास पोटांत ढकलून मीं आवरसावर केली. विचार करतां करतांच माझा डोळा लागला.

मध्यरात्रीं जागी झालें तों त्यांना फणफणून ताप आलेला आणि बडबडही सुरू होण्याचें चिन्ह दिसत होतें. माझ्या काळजानें ठाव सोडला. कुणाला बोलावूं अन् कुणाची मदत मागूं ?

‘ आशा .... .... आशा ! ’

मी जवळ गेलें. फणफणणाऱ्या तापाच्या अुष्ण बाहूंचा विळखा माझ्या मानेभोंवतीं पडला आणि डोळ्यांतून वाहणारे अश्रू माझ्या गालावर पडत होते.

‘ आशा, आशा. ’

—३—

‘ चित्रकार वेल्हाळ अत्यवस्थ आहेत. ’ अशी बातमी मीं दैनिकांत वाचली अन् घंटा झाली. ‘ अुत्कंठिता ’ या बोलपटांत एका

विरहिणीचें काम मला देण्यांत आलें होतें. आणि काम फार छान वठलें म्हणून डायरेक्टरांनीं माझी पाठ थोपटली. अन् मी हंसलें. पोटांत ज्वालामुखी आणि माथ्यावर हिरवळ असे पर्वत नसतात का ? चार दिवसांनंतर औटडोअर शूटिंग होतें म्हणून मी सकाळच्या डेक्कनक्वीननें मुंबईस गेलें. फोन करून डॉक्टरजवळ चौकशी केली. केस सीरियस असें कळतांच मी रडूं लागलें. कां बरं ? काय त्यांचा माझा संबंध ? अन् या चार महिन्यांत माझा जीव मला जड झाला होता. आयुष्य कंटाळवाणें वाटत होतें. यंत्रासारखं मी बोलपटांत काम करीत होते. डॉक्टरांची प्रत्यक्ष गांठ घेतली.

‘ अजूनहि वांचेल. पण पैसा नाही. ’

‘ डॉक्टर, वेल्हाळ वांचतील अजून ? ’

‘ होय. बिचारा गरीब आहे. बायको तर रात्रंदिवस झटते, पण पैसा कुठला आणणार ?’

‘ डॉक्टर, काय वाटेल तें करा पण त्यांना वांचवा. पैशाकडे बघूं नका. ’ मीं एक चेक फाडून त्यांच्या हातीं दिला. वेल्हाळांना बघायला जावं असं कितीतरी वेळ मनांत आलं. पण त्यांचं कुठं माझ्याशीं लग्न झालं होतं ? काय माझा त्यांच्यावर हक्क ? त्यांच्या दरवाजांतून किती तरी वेळां मी जड पावलानें परत फिरलें.

मी कामांत गर्क होतें. तरी जादा आकार भरून फोनवरून त्यांची बातमी विचारीत असे. हळूंहळूं त्यांच्या प्रकृतीला आराम पडूं लागला. माझ्या पैशांचं चीज झाल्याचा मला आनंद झाला. ब्राह्मणांना घर लुटावयास सांगावं आणि वैतागांन देशांतराला निघून जावं त्यांतलाच हा प्रकार. कामांत मन गुंतविण्याचा कितीं पण मीं प्रयत्न केला. बाह्योपचारी मी अितकी हसत खिदळत असें पण माझ्या खोलींत बिछान्यावर मीं अंग टाकलं कीं डोळ्याला डोळा लागत नसे. करुणरसाचा आर्तता माझ्या आवाजांत आलेली

आहे असें डायरेक्टर म्हणूं लागले. दिवसा काम कर कर करावं आणि रात्रीं पोटभर रडावं. मनांत भडकलेली आग डोळयाच्या पाण्यानें विझवावी. वेल्हाळावाचून मला जीवन अुदास वाटूं लागलं. पण मी कोण त्यांची? पैशानं काय प्रेम विकत घेतां येतं? अन् त्यांच्या बायकोचा नाहीं का त्यांच्यावर सर्वस्वी हक्क? देवा, प्रेमावाचून जीवन आणि अन्नावाचून प्राण सदा तळमळ करीत असतात. कंटाळा आला या निष्प्रेम जिण्याचा.

—४—

'अरेरे, च् च् च् सांपडली वाटतं मोटारीखालीं बिचारी?' फोनच्या घंटा वाजूं लागल्या. थोड्याच वेळांत द्रुतगतीनें अॅम्ब्युलन्स कार आली. तिला दवाखान्यांत नेलें व औषधोपचाराची ताबडतोब व्यवस्था झाली.

दुसऱ्या दिवशीं तिनें डोळे अुघडले तेव्हां तिच्या कॉटच्या अेका बाजूस वेल्हाळ व दुसऱ्या बाजूस त्यांची पत्नी माधुरी ही अुभीं होतीं.

'वेल्हाळ, वेल्हाळ, आलां का तुम्ही? आतां मी सुखानं मरेन.' तिनें पुन्हां डोळे मिटले. नर्सेस् व डॉक्टरांनीं औषधाचा डोज पाजला.

त्या रात्रीं तिनें डोळे अुघडले. वेल्हाळ बसल्या बसल्याच पेंगत होता. माधुरी जागी होती.

'माधुरी ताई, क्षमा करा. मला त्यांना पाहूं द्या.'

'आशा, हा पहा मी जवळ आहें. स्वस्त पड हं.'

आशेनें आपण होअून मोटारीपुढें देह टाकला होता. तिच्या पोलक्यांत वेल्हाळाला लिहिलेलें पत्र सांपडलें. आपली सर्व दौलत तिनें त्यांच्या नांवानें ठेवली होती. हें पत्र वाचतांना माधुरी गहिंवरली होती. स्त्रीहृदय होतं तें.

आशेनें पुन्हां डोळे अुघडले. वेल्हाळ जवळ गेला. त्याच्या गळयांत हात टाकून त्याच्या मुखावर तिनें मुख ठेवलें. क्षणमात्र ती हंसली.

शिरीषकुसुम दुपारच्या अुन्हाच्या तिरपीनें सुकून गेलें. तिनें जी अेकदां मान टाकली ती पुन्हां उचलली नाहीं. आशा-आशा करीत पुरुषासारखा पुरुष असून वेल्हाळ ओक्साबोक्शी रडत होता.

'मला क्षमा करा. मी अपराधी आहें.' पत्नीकडे पाहत वेल्हाळ पुटपुटला.

'अपराधी कोण ?'

(अप्रकाशित)

---

*

# ४

# रातराणि

[कवि–मनोहर, सातारा]

( वृत्त–वारुणी. चाल–पाणपोई )

परतली अभिसारिका ही ! अब्धि हा फेसाळला,
बाग फुलली, रान हंसलें, देव जागा जाहला.
डामरी हे मार्ग फुलले, फट्फटी, मोटार धांवे,
चारुतेला पूर आला, घुमति वरती पारवे.
भोंवतालीं तुंग प्रासादाऽवली डोकावते,
हांसरें उद्यान मध्यें, स्फाटिकांचीं पदपथें.
कृत्रिमाचा हा पसारा—नगर साजे नांव त्याला,
भासते सोन्यापरी ही धूळ नवख्या दृष्टिला !
रसिक पथिका, वास नाहीं रंगीबेरंगी फुला !
पौर जन हे तैल बुद्धि, जानपद तूं बावळा,
फूलवेड्या भूल पडली, ती जिव्हारीं घाव घाली,
मृगजळानें कां कुणाची तीव्र तृष्णा शांत झाली ?
हात मागें घे, नको तोडूंस सुमनें हांसरीं,
आंत काटे, भोंवतीं हे द्वाररक्षक खंजिरी.

रंग डोळे दिपवि, पाडी भूल पथिकाच्या मना,
पसरला अंधार चित्तीं, फूल हातीं येइना.
पौरजन–निर्बंध भारी, अश्रु आले लोचनीं,
राहिलें उद्यान मागें नगरसीमोल्लंघनीं.

*    *    *    *

झापडी ये नयनिं त्याच्या, कौमुदी न्हाणी मही,
गंध सुटला, पवन नटला, मुदित झाला पांथही,
कोण ही अदृश्य देवी दिव्य गंधा वर्षते?
याचनेचें काज नाहीं कल्पवृक्षाखालतीं!
रंग साधा, वास भारी, करि कृपेची साउली,
'कोण गे तूं देवता?' 'मी रातराणी आपुली
शांत पांथा घे फुलांचा वास भरुनी अंजुली.'

—विविधवृत्त खास अंक १९३४

# रातराणी

ती त्याच्याकडे मोठ्या कौतुकानें पाहत होती.

काय त्याचा तो रुबाब!

आणि डौल तरी केवढा!

त्यानें अगदीं सर्वांचें लक्ष वेधून घेतलें होतें. जन्माला येऊन एकदां तरी त्याला पाहावें असेंच वाटे.

तो—तो कोणी सुंदर नट नव्हता, काव्यगायन करणारा प्रेमवेडा कवि नव्हता किंवा तुफान भाषण करणारा मैदानी वक्ताहि नव्हता.

तो—तो कॉंग्रेसचा मंडप होता. आणि ती त्याला पाहण्यांत गढून गेली होती. कोण ती गर्दी ! अन् काय ती गडबड !

'अरेरे, गुदमरलें वाटतें हें मूल !'

'वॉटर, वॉटर प्लीज.' अेक स्वयंसेवक ओरडला. ती झटकन् पुढें झाली. बॅगमधून तिनें अेक बाटली काढली व त्या मुलाच्या नाकाशीं धरली. ती त्या स्वयंसेवकाकडे टक लावून पाहत होती.

'Thanks.'

तिनें त्याच्या आभारांचा स्मितपूर्वक स्वीकार केला. पण त्याला तिच्याकडे पुरतें बघायलाही फुरसत नव्हती.

'मिस्टर व्हालंटिअर I have lost my wife' तो स्वयंसेवक तशा गडबडींतहि जरा हंसला. त्यानें ओरडून विचारले :

'Name please?'

'विनोदिनी रमण'

लाअुडस्पीकर्समधून व टेलिफोनमधून 'विनोदिनी रमण' हें नांव सर्व कॉंग्रेसभर दुमदुमलें.

'Captain, my husband, oh, where is he?' पुन्हां अेकदां त्यानें त्या चुकलेल्या नवऱ्याच्या स्त्रीकडे पाहिलें.

'रेवा शंकर त्रिवेदी'

'Oh, don't worry, Please' त्यानें त्या घाबरलेल्या गुर्जर तरुणीला अुत्तर दिलें. 'We will find him soon.' कुणाचा पति हरवला, कुणाचें मूल चुकलें, कुणाची स्त्री सांपडेना, पैसे तर जे अेकदां गेले ते पुन्हां दिसलेच नाहींत. कितिकांची देश-भक्ति गमावली. शहाण्या सुत्यांचें राष्ट्रप्रेम हरवलें. महात्म्यांचा लोकसंग्राहक राजकारणाचा ताल चुकला, सरदारांची साधी माणुसकीही हरवली. खुद्द सभेचीच देशाच्या अुत्कर्षाची कळकळ गमावली कीं काय असाहि ध्वनि अुठला.

या चुकल्या गोष्टी शोधून काढतां काढतां तो स्वयंसेवक अगदीं

मेटाकुटीस आला होता. चुकलेल्या मुलाचा पत्ता लागला. हरवलेले पतिपत्नी हातांत हात घालून घरीं जाऊं लागले. कपाळाचा घाम पुशीत व घसा फुटेपर्यंत ओरडत तो स्वयंसेवक आपलें काम करीत होता आणि ती मात्र तेथेंच अजूनहि अुभी होती. त्याच्याकडे वेड्या-सारखी पाहत होती.

आज अधिवेशनाचा शेवटचा दिवस. प्रेक्षकांनीं मंडप नुसता फुलून गेला होता. मधून मधून सन्मानाच्या आरोळ्यांची लाट अुठे. स्वयंसेवकांच्या तंबूजवळ अेक ब्यूक गाडी येअून अुभी राहिली. आंतून कोणीसे म्हटलें :

‘ You are over working, dear ’

त्याने तिकडे पाहिलें व तो मोठ्यादा हंसलाहि. स्वतःच्या मनगटी घड्याळाकडे पाहून ता म्हणाला. :

‘ Five minutes, please. ’

‘ O. K. मोटारीतून सस्मित अुत्तर आले. अितक्यांत दुसरा त्याचा मदतनीस आलाच होता. त्याला झटपट तो कांही सांगत होता. खादीसिल्कचा कोट अंगात चढवून त्यानें डोक्यावर टोपी ठेवली आणि मोटारीच्या नुकत्याच अुघडून ठेवलेल्या दारावर त्याने हात ठेवला.

‘ सी बीच ! दोन तासांत परत अधिवेशनाला आलं पाहिजे मला. आज जास्त सवड नाहीं. ’

‘ होय, होय, होय. आंत बसायला काय घ्याल ? ’

‘ अेक गोड—’ मोटारचें दार लावण्याच्या आवाजांत पुढें कांहीं अैकू आलें नाही. मोटार भर्रदिशी निघून गेली. ती हा सर्व प्रकार पाहत होती. तिनें अेक सुस्कारा सोडला. पुन्हां अेकदां तिच्या बॅग-मधील औषधाचा उपयोग करण्याची संधि आली. गुदमरलेल्या त्या लहान मुलीला सावध केल्यावर तिनें विचारलें :

‘ आतां कुणाची गाडी गेली ती ?’

‘ मनोहर पुरंदरे. आमच्या स्वयंसेवक दलाचे मुख्य आहेत ते. ’

'आणि गाडींत ती मुलगी कोण होती ?'

तिच्याकडे थोड्या चमत्कारिक तऱ्हेनें पाहून त्यानें अुत्तर दिलें.

'त्यांची नियोजित वधू—सुधा साठे.'

मंदगतीनें ती मंडपाच्या बाहेर चालली होती. समोर सागरलहरी नाचत होत्या. आणि तिचें हृदयहि भरून आलें होतें. मंडपांत विद्युद्दीप झळकूं लागले होते व आकाशाच्या अंगणांतहि देवाचे दिवे लकाकत होते. पण तिच्या हृदयांतला मंद आशादीप विझण्याच्या बेतांत आला होता. लोकांची सारखी धावपळ सुरूच होती. तिचें मन मनोहरामागें धांवत होतें तर तिच्या सुखानें पळ काढला होता. समुद्र किनाऱ्यावर जड पदांनीं हिंडतां हिंडतां तिनें स्वतःशींच म्हटलें :

'मनोहर पुरंदरे' तिचा चेहरा फुलला.

'सु–धा–सा–ठे तिच्या डोळ्यांत अश्रू अुभे राहिले. आकाशाकडे पाहून तिनें म्हटलें :

'मनोहरांची सुधा तर मग मी कुणाची ?'

—२—

'हं बोल शुक्ल कीं कृष्ण ?'

'मला आपला शुक्लपक्षच आवडतो गडे. नको ग बाई त्या अंधाऱ्या रात्रीची कल्पना.'

'शुक्लाच्या मागें कृष्ण आहेच कीं अुभा. सुधा, विभावरीची अिच्छा पुष्कळ असेल कीं आपल्याजवळ नेहमीं शरदीय पूर्ण चंद्रमाच असावा म्हणून. पण हा शुक्लकृष्णपक्षांच्या पाठशिवीचा खेळ रजनीला कांहीं थांबवितां येत नाहीं. सुखदुःखाचं मिश्रण म्हणजेच आयुष्य नाहीं कां ?'

'पण, मनोहर'—

प्रस्तुतची ही विचारसरणी देशाच्या प्रगतीला जबरदस्त अडथळा करून जात्यंध धर्म वेड्याचं कोटकल्याण करील.'

' मला माहीत आहेत तुमचीं मतं.'

' मनुष्य औीर्ष्येला पेटल्यावर काय करणार नाहीं ? तत्त्वाकरितां मी कसून केलेला विरोध शेवटीं माझ्या वैयक्तिक भवितव्यावर घसरला. कालच त्यांनी मृत्युपत्र केलं. यापुढं मला फक्त ५० रुपये तहाहयात मिळावयाचे आहेत. ग्रामसंघटणेला त्यांनीं आपली सर्व धनदौलत देअून टाकली आहे. आणि सुधा, फक्त अेकाच आशेवर मी आतां जगणार कीं तू माझी होशील '

सुधा क्षणांत मनोहराकडे, क्षणांत बाहेरच्या रस्त्याकडे पाहत अुभी होती.

' पण प्रत्यक्ष पोटच्या गोळ्याला त्यांनीं असं कसं नागवलं ? '

मनोहर अुदासीनतेनें हंसून म्हणाला,

' मी त्यांचा दत्तक पुत्र आहें. वयाच्या चौथ्याच वर्षीं त्यांनीं मला दत्तक घेतलं बडोद्यांत.'

सुधेनें अेक निश्वास सोडला.

' वयाच्या दहाव्या वर्षीच माझं पहिलं लग्न झालं '

सुधा ताडदिशी कोचावरून अुठून अभी राहिली. 'आज काय अुल्कापाताचा दिवस आहे कीं काय ? '

' अशी आश्चर्यानें पाहूं नकोस माझ्याकडे. बडोद्याच्या जल-प्रलयांत ती माझी बालपत्नी सांपडली होती. त्यांतच तिचा शेवट झाला. पुढं कांहीं थांग लागला नाहीं. लग्नानंतर दुसऱ्याच वर्षीं हा प्रकार झाला.'

यावेळी सुधा माडीवर फेऱ्या घालीत होती. मनोहरानें तिला दर्पणासमोर नेअून म्हटलें ' माझी खात्री आहे कीं तूं कोणत्याहि परिस्थितींत माझीच होशील. तुझ्यापासून मी काय चोरून ठेवूं ? तूं माझी सुधा ना ?'

## –३–

' डॉक्टर, जशी तुमची वाणी गोड आहे तसाच हातहि कुशल आहे तुमचा. तिला जीवदान तुम्ही दिलंत आणि मलाहि धीर दिलात.'

पण डॉक्टरीण बाईंचें लक्ष टेबलावर पडलेल्या दैनिकाकडे होतें. हातानें नाडी पाहत असतांना डोळे मात्र त्या दैनिकावर खिळलेले होते.

' ठरलेलं लग्न मोडलं '

हा तो मथळा होता.

इतक्यांत धाकटा मधु धांवतच आला आणि त्यानें नेहमीप्रमाणें डॉक्टरीणबाईंच्या पायाला विळखा घातला.

' वा रे लबाडा' त्याला मांडीवर घेऊन त्या दैनिकांतला मथळाहि त्या वाचूं लागल्या. अेका हातानें मधूला प्रेमानें कुरवाळीत असतांना डोळे मात्र झरझर त्या मजकुरावरून फिरत होते. वाचन संपतांच त्यांची चर्या जराशी प्रफुल्ल झाली. मधूची रुग्ण माता म्हणाली,

' त्या फिसकटलेल्या लग्नाची बातमी का वाचतोय ?

' होय. गम्मत दिसतेय बरीच.'

' गम्मत कसली ? तिनंच नकार दिला साफ.'

' कां? '

' मनोहर श्रीमंत असतांना लग्न ठरलं आणि आतां तो गरीब झाला म्हणून! '

' अरेरे, फसवलंच कीं तिनं मग.'

' हो. नाहीं तर काय ? पण त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. सुधा अन् मी मॅट्रिक बरोबरच झालों. मला माहीत आहे अगदीं पहिल्या नंबरची हावरट आहे ती.'

–पण मनोहराच्या मात्र जन्माची निराशा झाली. डॉक्टर,

मींहि पण मनोहराचा सहाध्यायी होतों. मी वकील झालों अन् तो चित्रकलेंत पारंगत झाला. वाचनहि त्याचं जबर आहे अन् राहणी किती निर्मळ म्हणून सांगूं ! श्रीमंतीचा गर्व नाहीं, गरीबासाठीं नेहमी झटणारा आज अुघडा पडला. त्याचा बाप म्हणजे पक्का बेगडी देशभक्त. खादीच्या चळवळींत लक्षावधी रुपये वाटेल त्या मार्गानें मिळवले. अन् आतां हाव सुटली आहे असेंब्लींत निवडून येण्याची.'

'हं. कुठं राहतात हे तुमचे मि. पुरंदरे ?'

'अहो तुमच्या दवाखान्यासमोरच. कालच त्यानं बापाचं घर सोडल. आतां त्याला पन्नास रुपयांत महिना गुदरायचाय.'

'गुड नाअिट, अुषाताअी. आतां तुमचा रोग गेला हं. चल रे लबाडा जाअूं दे मला' अुषाताअींच्या पतीनीं कृतज्ञतेनें पन्नास रुपयांची नोट त्यांच्या हातांत ठेवली.

'डॉक्टर तुमचे अुपकार फार आहेत. आज तुम्हीं तिला जीवदान दिलंत.'

'गुड नाअिट' डॉक्टरांची मोटार चालू झाली.

* * *

'रसिक पथिका, वास नाही रंगीबेरंगी फुला.'

तिनें फोनो बंद केला आणि अितका वेळ बाहेर अुभा असलेला मनोहर नम्रपणें आंत आला.

'मि. पुरंदरे, तुमचे ब्लॉक्स मला पसंत आहेत. ते मी छापखान्यांत पाठवून सुद्धां दिले. मेनी थँक्स्' तिनें तेंच रेकॉर्ड पुन्हां लावलें.

'किती छान आहे नाहीं ही कविता ? रातराणी, किती गोड नांव आहे नाहीं ? अशा कविता जर सचित्र छापल्या तर काय बहार होअील. अन् हा रातराणी लिहिणारा कविसुद्धां फार लाजाळूच दिसतो मला.'

‘ हो, त्यानं काव्यगायनाचा धंदा नाहीं सुरू केला.’

‘ अिथंच चुकतं तुमचं. जी पैसे भरपूर देणार नाहीं ती कला कसली ? ’

‘ कलेवर पोट जाळण्यापेक्षां अुपाशी राहिलेलं काय वाईट ? ’

‘ म्हणूनच अभिजात कलावंत दरिद्री असतात ना ? ’

‘ आपल्याला नकली मोतीं जास्त आवडतात का ? त्यांचें पाणी चमकदार असतें आणि आकारहि डौलदार असतो. ’

‘ पण हें नकली तेज लौकरच फिक्कं पडतं ! आणि गोलदार दाणा खडबडीत होतो. ’

‘ त्याचप्रमाणं सवंग लोकप्रियतेवर अल्प काळ पोट जाळणारे हे नामधारी कलावंत काळाच्या कसोटीला अुतरत नाहींत. ’

‘ पण जीवनाला पैसा तर अवश्य आहे. झटपट श्रीमंत होण्याचा मार्ग नाहीं का तुम्हाला माहीत ?’

‘नाहीं, आणि मला आवश्यकताहि नाहीं. ’

‘अितक्या तरुण वयांत तुम्हाला वैराग्य येणं हें आश्चर्यकारक नाहीं का ?’

मनोहरानें या प्रश्नाचें अुत्तर दिलें नाहीं. त्याचे डोळे पाण्यानें भरूं लागले होते.

‘ बरं सवडीअंतीं पैसे पाठवून द्यावेत. ’

‘ बरं. पण हो, मि. पुरंदरे, शारीरशास्त्रावर मी आणखी अेक ग्रंथ लिहिणार आहें. त्यासाठीं मला हिंदुस्थानांत प्रवास करावयाचा आहे. त्याचे ब्लॉक्स द्याल का करून ?

‘ हो अगदीं आनंदानें. ’

‘ पण माझ्याबरोबर प्रवास करण्याची तयारी पाहिजे तुमची. ’

‘ होय. पण मी गरीब आहें. ’

‘ ठीक, नाताळांत बनारसला जाण्याचा विचार आहे माझा. ’

## —४—

' बक् अप्, मॅन डोंट टेक अिट सिरिअसली.'

मनोहराच्या पाठीवर थाप मारून त्याचा अेक बालमित्र म्हणाला.

' तिनं तर त्या प्रिन्सिपॉलशीं लग्न केलं म्हणे. बरं, चाललास कुठं?'

' काशीला.'

' कां, थिऑसफिस्ट झालास कीं काय?'

' कवि ही जशी शिवी झाली आहे, तसा थिऑसफिस्ट चेष्टेचा विषय झालेला अजून माहीत नाहीं. सहज जातोंय गमतीनं'.

' अच्छा, गुड लक्, अन् किती रे मनाला लावून घेतलीस ही गोष्ट. अरे अेक सोडून छपन्न बायका मिळतील. त्या सुधेची काय अेवढी हाय घेतलीस तूं. तुझ्यासारख्या देखण्या तरुणाला बायकांचा काय तोटा?'

' मीं आतां लग्नाचा विचार सोडूनच दिला आहे. A wife is a knife.'

' Humbug, a wife is life.'

' बरोबर आहे. म्हणूनच ती सुरी अुरीं बसते.'

गाडीची घंटा झाली.

अंगांत ओव्हरकोट घालून सेकंड क्लासच्या गादीवर पडून डॉक्टरीणबाअी बाहेरचा हा संवाद अैकत होत्या.

सर्व्हंट्स्च्या डब्यांत मनोहर चढला व गाडीनें बोरीबंदर सोडलें.

*   *   *

पहांटेचा गार वारा अंगाला झोंबूं लागला होता. डिसेंबरची थंडी. निघण्याच्या धांदलींत मनोहर गरम कपडे आणावयास विसरला। होता असें नव्हे तर त्याच्या स्थित्यंतराच्या या दोन वर्षांत जास्त चैन करावयास त्यास सवडच नव्हती. खालीं टॉअिम्सचा अंक पसरून जवळ जवळ तो थंडीनें कुडकुडतच पडला होता आणि त्याचा डोळा

लागणें शक्यच नव्हतें. निद्रा सुद्धां अुबदार श्रीमंतीवरच फिदा होते. कुडकुडणारी गरिबी तिला कुठून आवडायला ?

'मि. पुरंदरे, तुम्ही भरपूर कपडे नाहीं आणले ? '

'नाहीं.' तो अुठून म्हणाला.

स्वतःचें दारिद्र्य तोंडानें सांगणें कुणाच्या जिवावर येत नाहीं ?

'तिकडे चला पाहूं जरा. हं झोंपा त्या बिछान्यावर. अगदीं संकोच करायचा नाहीं. मला माझे ब्लाक्स् करून घ्यावयाचे आहेत तुमच्याकडून.'

मनोहर तसाच अुभा होता. अंगांत ओव्हरकोट घालून हुकमी आवाजांत आपली कींव करणारी ही डॉक्टरीण या वेळीं त्याला तिरस्कारार्ह वाटली. सुधेनें दगा दिल्यापासून त्याला स्त्रीजातीचा तिटकारा आला होता. आपलीं चित्रें घेअून मागूं तें मोल देणारी स्त्री या दृष्टीनेंच तो तिच्याकडे पाहत होता. तिचा स्वर शेवटीं आर्जवी झाला तरी तो त्या बिछान्याकडे पाहीनासुद्धां. शेवटीं तिनें आपला ओव्हरकोट काढून टाकला आणि ती स्वस्थ खिडकी अुघडी टाकून बसली.

स्त्रीचरित्र गहन आहे हें वाक्य चट्दिशीं त्याच्या मनासमोर आलें. पण गरजवंताला अक्कल नाहीं म्हणून त्यानें त्यांतील अेक रग अुचलला.

'अंहं:, अिथंच झोंपायचं तुम्ही.'

'आणि तुम्ही ?'

'माझी झोंप झाली आहे. मी जागत बसेन.'

'नको, मी जातों हा रग घेअून.'

'बरं जा. मी हा स्वेटरही टाकते काढून अंगांतला. तिची वाणी व करणी अेक आहे असा त्याला अनुभव आला. डॉक्टरीण-बाईचं शरीरसौष्ठव व तारुण्य त्या विरळ वस्त्रांत प्रतीत होत

होतें, तरी मनोहराच्या रसिकतेची राख झाली होती व सुधेच्या नकारानें तो संन्यासी बनला होता.

हळूहळू त्याचे डोळ्यावर झांपड पडली. डॉक्टरीणबाअी त्याच्या निद्रिस्त मुखाकडे पाहत किती तरी वेळ बसल्या होत्या. गाडीच्या वेगापेक्षांहि त्यांचें मन वेगानें धावत होतें. त्यांनीं खिडक्या बंद केल्या. दरवाजा आंतून लावून घेतला व दिवाहि मालविला.

थोड्या वेळांत मनोहर धडपडून जागा झाला. त्याच्या गालावर अुष्ण अश्रू पडत होते आणि मानेभोंवतीं कोमल करांची मिठी पडली होती. त्याला कदाचित् भासहि झाला असेल, पण त्याच्या ओंठावर दुसऱ्या कोणी तरी आपले अधर ठेवले.

मनोहर ताड्दिशी अुठून अुभा राहिला. स्पर्शसुखानें पुलकिततनु झालेल्या डॉक्टरीणबाअी अधोवदन अुभ्या होत्याशा दिसल्या. त्यानें दिवा लावला. अेकच तिरस्काराची दृष्टी टाकून त्यानें दरवाजा अुघडला व तो म्हणाला:

'अुद्यां मी मुंबअीस परत जाअीन.'

आपल्या कागदी बिछान्यावर त्यानें धाड्दिशी अंग टाकलें.

'नाथ.'

मनोहर तुच्छतेनें हंसला.

'मी पैशाच्या लोभानं पापाला मिठी मारणारा नाहीं. जा. माझ्यावर केलेल्या अुपकारांची फेड अशा व्यभिचारांत होअील ही तुमची कल्पना चुकीची आहे. मी पैशाचाहि हावरा नाहीं व तुमच्या प्रेमाचाहि भुकेला नाहीं.'

'नाथ, पण मी आहें. हा व्यभिचार नाहीं आणि हें पापहि नाहीं.'

'ही आभिसारिकेची नीति मला नको.'

'मी अभिसारिका नसून सती आहें.'

'हुं: पतिवाचून सती.'

'माझे पति माझ्याशीं बोलत आहेत.'

' प्रायोगिक विवाहपद्धतीनंसुद्धां आपले पति येथें नाहींत.'

' प्रायोगिक नाहीं, वैदिक. नाथ, मी आपली दासी आहें.'

' बस्स. पुरे झाला हा पांचटपणा. पवित्र प्रेमाची सर पांचटपणाला कधीं येत नाहीं. असल्याच वर्तनानं आज प्रेमाचा विषय थट्टा करण्याजोगा झाला आहे. नव्या नीतीचें हें पहा खरें स्वरूप.'

' नाहीं, ही नवी नीति नाहीं. पंधरा वर्षांपूर्वीं बडोद्यास माझा विवाह झाला. नाथ, माझं नांव रजनी.'

मनोहर अुठून अुभा राहिला.

' आं ! बडोद्यांत ? पंधरा वर्षांपूर्वीं ? रजनी ? ' त्यानें आपलें डोकें दाबून धरलें. त्याला भोंवळ आली. त्यानें पुन्हां डोळे अुघडले तेव्हां रजनी त्याला मांडीवर घेअून बसली होती व त्याच्या तोंडांत चार औषधाचे थेंब ती टाकीत होती.

जबलपूरजवळच्या भेडा घाटावरून गाडी धांवत होती.

' रजनी, ' मनोहरानें पुन्हां डोळे मिटले. रजनीच्या मुखावर हास्य चमकलें. औषधाचा परिणाम ताबडतोब झाला. हळूहळू मनोहर अुठून बसला. तिच्याकडे निरखून पाहत तो पुन्हां पुट-पुटला ' रजनी '

' काय नाथ ? '

' रजनी, माझा विश्वास नाहीं बसत. स्त्रीचरित्र गहन आहे. रजनी जलप्रलयांत बुडून मेली.'

' नाहीं. अशी वार्ता अुठली. बुडत्यालाहि हात देणारा परमेश्वर असतोच. त्या जलप्रलयांतून वांचविणारा माझा प्रेमळ परमेश्वर आज या काशींत आहे. चला, त्यांचेकडून आपण खात्री करून घ्या. प्रो. वेंगुर्लेकरांनीं मला बडोद्यास वांचविलं. आमचं सगळं घरदार जलमय झालं होतं. त्यांनीं मला तेथून कलकत्त्यास नलं. मला मुलीप्रमाणं वागविलं. डॉक्टरीचं शिक्षण पुरं केलें. व दोन वर्षांपूर्वींच मी मुंबअीस आलें.'

'आम्हांला कसं नाहीं कळलं ?

'आपण बडोदें सोडलंत. मुंबअीला गेलांत. आपला पत्ता कसा बरं माहीत असावा ? मी त्या वेळीं आठ वर्षांची होतें. आपल्याला वाटलं मी मेलें. '

—५—

' ओहो, या रजनी, आज काय लाभ आहे बुवा. अन् हे कोण ? सांपडला कीं काय तुझा हरवलेला नवरा? '

प्रोफेसरांनीं सर्व वृत्तांत आपण होअूनच सांगतांच मनोहराची खात्री पटली.

कमच्छांतील थिऑसफिकल लॉजमध्यें मंडळी अुतरली होती. मनोहर व रजनी रात्रीचे वेळेस बागेंतून फिरत होतीं. तों अितका सुगंध त्या ठिकाणीं दरवळला होता कीं तो अगदीं मोहित होअून गेला. शेजारच्या वेलीचीं मूठभर फुलें रजनीनें तोडून आणलीं व मनोहराच्या हातांत दिली.

' हें काय ? '

' रातराणी. '

' रातराणी ? अरेरे विलायती फुलांचा मोह मीं धरला आणि रातराणी आपण होअून मला लाभली.

' रजनी, मला क्षमा कर. '

याचनेचें काज नाहीं कल्पवृक्षाखालती श्रांत पांथा, घे भरोनी, ।
पूर्ण आपली अंजुली, ' कोण गे तूं देवता? ' मी रातराणी आपुली.

' किती गोड गीत आहे नाही हें ? '

' हो, आतां गोड लागतं आहे. '

' बरं, चला, अुद्यां गंगास्नानाला जाअू.'

' जोडीनं बरं क्का ? ' (अप्रकाशित)

# ५

# विमा अेजंट

नारायणरावांचा स्वभाव पराकाष्ठेचा नादी होता. डोक्यांत जें अेकदां खूळ शिरेल तें शिरेल. पंचविशीच्या आंत अेम्. अे. अेल्. अेल्. बी. होअून सुद्धां निव्वळ धंद्याबद्दल नावड म्हणून ते वकिली क्वचित् करीत. कॉलेजांत असतांना काव्याची गोडी लागली पण पांच सहा वर्षांत थंडावली. मग हस्तसामुद्रिकाचा अभ्यास झाला सुरू. हस्त-सामुद्रिकानेंहि यांना चांगलाच हात दाखविला. मग हस्तकौशल्याला सुरवात झाली. कवितेवर पैसा मिळविणें म्हणजे साहारांत शीतोदकाच्या स्नानाचीच अिच्छा ! नारायणरावांची कोणतीहि लहर फार दिवस टिकत नसे. चित्तचांचल्य हा स्वभावविशेष होता; त्याला धांदरट स्वभावाची जोड, मग काय विचारावे ! हल्ली त्यांना विम्याच्या अेजंटाचें काम आवडू लागलें. सभेंत, नाटकांत, चार चौघांत नारायणरावांची दृष्टि आपली कुळें शोधण्यांत गर्क असे. पण त्याचा परिणाम मात्र विपरीत होत असे. वीस वर्षांच्या तरण्या बांडापासून पंचेचाळीस वर्षांच्या प्रौढापर्यंत जो जो त्यांच्या नजरेंत येअील त्याचा पिच्छा ते सोडीत नसत. अशी अेकाद्याची बारीक चौकशी ते दुसऱ्या-जवळ करू लागले म्हणजे गुप्त पोलिसाच्या भीतीनें लोक जपून बोलत किंवा कांहीं टवाळ त्यांना भलतीच माहिती देत.

परंतु नारायणराव आज फार खुषींत होते. त्यांना पंचवीस हजारांचा विमा अुतरणारी अेक केस मिळाली होती. त्यामुळें शनिवारीं रात्रीच्या गाडीनें स्वारी मुंबअीस निघाली.

मुंबअीला अेकटें जाण्याचा त्यांचा हा पहिलाच प्रसंग. अेम्. अे.

ा थीसिस लिहून त्यांनीं वेळ भागविली होती व वकिलीची सनद घेतेवेळीं अुभ्या जन्मांत अेकदांच त्यांनीं मुबअीची फेरी केली होती. आतां त्यांना परळला अुतरावयाचें होतें. दादर सुटल्यावर बॅग घेअून नारायणराव अुतरण्याची तयारी करूं लागले, पण गाडी परळवरून झपाट्यानें गेली भायखळ्याला. तेथून डाअुन प्लॅट-फॉर्मवरून ते दुसऱ्या अेका गाडींत बसले. तरी ती परळवरून झपाट्यानें जाअून थांबली कुर्ल्याला. अशा प्रकारें कुर्ला ते बोरीबंदर त्यांच्या दोनतीन फेऱ्या झाल्या. त्यांना वाटलें की, आगगाडीनें परळवर पूर्ण बहिष्कारच घातला आहे. शेवटी भायखळ्यावरून व्हिक्टोरिया करून परळला आले तों बगल्याचा पत्ता लागण्याची मारामार. ट्राममध्ये बसून दोन्ही बाजूंच्या पाट्यांचा सूक्ष्म अभ्यास केला तरी पत्ता नाहीं. ट्राममधून अुतरतांना त्यांनीं मुंबापुरीस साष्टांग नमस्कार घातला तर चढतांना पुणेरी जोडा अेक रस्त्यावर तर दुसरा पायांत अशी स्थिति झाली. माणसांनी फुललेली मुंबापुरी त्यांना निव्वळ यमपुरी भासली. रस्ता ओलांडताना मोटारी चुक-वीत असतां त्यांना आट्यापाट्या खेळल्याचाच भास झाला. विश्राम-भुवनांनी गजबजलेल्या मुंबापुरीत पाणी पिण्याकरितां अेकहि नळ दिसेना की हौदहि आढळेना. लघुशंका कोठें करावी या विचारानें तर त्यांना अगदी सतावून सोडले. लोकसमूहानें फुललेली, सुंदर अिमारतींनी सजलेली, विविध वाहनांनी गजबजलेली मुंबापुरी या भांबावलेल्या पुणेरी ब्राह्मणाला साहाराप्रमाणें वाटली. पायांत जोडा नाहीं, तोंड घामाने डबडबलेलें, सभोंवार मुंबअीचा बेफिकीर अफाट लोकसमूह, अपेय पान व अभक्ष्य भक्षण करण्याची संवय नसल्यामुळें होणारे हाल, यामुळें लोकांच्या आयुष्याचा विमा अुतरण्याअैवजी आपलें आयुष्यच गमावते की काय अशी त्यांना भीति वाटू लागली. अितक्यांत त्यांना सार्वजनिक टेलीफोन दिसला. लगेच त्यांनीं अेक नंबर काढून फोन केला. ...बडींत

त्यांना हव्या असलेल्या नंबरांत अेका आंकड्याची चूक झाली. त्यामुळें खालील फार्स अुडाला:—

"हॅलो, ठरल्याप्रमाणें मी आलों आहें. गाडी अगर माणूस पाठवा. नारायण कुलकर्णी, वकील."

"वाट पाहत आहोंत. गाडी पाठविली आहे."

पंधरावीस मिनिटांत अेक बेबी ऑस्टिन कार आली.

"चला, साहेब घरीं वाट पाहत आहेत." थोडक्याच वेळांत अेका सुंदर छोटेखानी बंगल्यांत गाडी शिरली. दारांत अेक सुंदर कुमारी स्वागतासाठीं पुढें आली. बंगल्यांत सौन्दर्य व शान्तता नांदत होती. "आपल्याला यायला अुशीर कां बरें झाला?" गोड आवाजांत बालिकेनें विचारलें.

"माझी गाडी चुकली." नारायणरावांनीं थाप दिली.

"बरं स्नानाची तयारी आहे. आपली वाट पाहून शेवटीं आम्ही आतांच जेवलों. बाबा माडीवर निजले आहेत. आपलें जेवण होअीतों-पर्यंत बाबा अुठतील." बालिकेच्या मुग्ध कटाक्षांनीं नारायणराव जरा गांगरून गेले. हा काय प्रकार आहे तें त्यांना समजेना.

पूर्वीं मुंबअी जितकी त्यांना गैरसोयीची वाटली तितकीच आतां सुखकारक वाटूं लागली. स्नानगृहामध्यें तेल, साबण, आरसा, शीतोदक वगैरेंची आंत व्यवस्था होती. नंतर सुग्रास भोजन आग्रहानें वाढणारी सुंदर बालिका, मग नारायणरावांनींहि यथेच्छ हात मारला.

भोजनानंतर तांबूल भक्षण करून दिवाणखान्यांत आराम-खुर्चीवर विजेच्या पंख्याखालीं नारायणराव वर्तमानपत्रें वाचीत पडले होते. मधून मधून बालिकेनें विचारलेल्या प्रश्नास अदमासानें अुत्तरें देत होते, अितक्यांत अेक खानदानीचे वृद्ध गृहस्थ खालीं आले.

'नमस्कार, वकील साहेब, क्षमा करा आम्हीं अगोदर भोजन केल्याबद्दल. अहो तुमची हयगय करून चालणार नाहीं आतां.'

' कांहीं हरकत नाहीं, मात्र थोडा अुशीर झाला यायला.'

' बरं प्रभा, चहा आण पाहूं ! म्हणजे मग कामाला सुरवातच करूं ' असें म्हणून त्या गृहस्थांनीं अेक लठ्ठ चिरूट पेटविला व अेक नारायणरावांना दिला.

' काय, नको ? आणि चहाहि घेत नाहीं ? वा ! प्रभा, तुझं कसं जमणार बाळ ? '

प्रभा नारायणरावांकडे सकौतुक पाहात म्हणाली,

' बाबा, मलाहि कांहीं चहाचं वेड नाहीं.' नारायणराव स्तंभित झाले.

' हें पहा वकीलसाहेब, पत्रोपत्रीं सर्व हकीगत तुम्हांला कळविलीच आहे. ही केस कांही भानगडीची नाहीं. पग प्रत्यक्ष भेटींत ठरवावें म्हणून तुम्हाला अिथं येण्याची तसदी दिली. माझ्या पुर्नविवाहित कुटुंबापासून झालेली प्रभा ही तुमच्यापुढें अुभी आहे. ती चांगली मुशिक्षित आहे. माझा पन्नास हजारांचा विमा तिच्याच नांवचा आहे. व आम्हांला दोघांनाहि जन्मभर पुरेल अितकी माझी अिस्टेट आहे. तुम्ही स्वतः मुशिक्षित आहांत व तुमच्या मुग्ध रुकारावरून मुधारकी बाणा दिसून आला ही आनंदाची गोष्ट आहे.

नारायणरावांनीं संमतिदर्शक स्मित केलें. पण कोणत्या गोंधळांत आपण सांपडलों आहोंत याची त्यांना कल्पना होअीना.

' तुमचा फोटोग्राफर मात्र अगदीच पुणेरी दिसतो. अहो, कांहीं तरी साम्य असावयास पाहिजे होतं. फोटो पाहून नाराज झालेल्या प्रभेची कळी तुम्हांला पाहून खुललेली दिसते. कारण, आज तीन वर्षें खटपट करतों आहे पण पोकळ सरदार घराण्यांतील अत्यल्प शिक्षणानें शेफारलेल्या पोरांनीं आम्हांला अुत्तरें दिलीं कीं, ' पुर्नविवाहित कुटुंबाच्या मुलीशीं आम्ही लग्न करणार नाही ! ' तेव्हां त्यांचा नाद सोडून दिला. माझ्या अेका पुणेकर मित्रानं आपलं नांव सुचविलं तेव्हां हा योग जुळून आला. अितक्यांत ब्राह्मणानं चहाचा अेक पेला व

केशरमिश्रित दुधाचे दोन पेले आणले. नारायणरावांची पिळदार देहयष्टि, निर्व्यसनी सालस वर्तन, पुणेरी बाण्याला शोभणारी साधी राहाणी पाहून बापलेक खूष झालीं होतीं. " आपली संमति मिळाली म्हणजे पुढची तयारीसुद्धां करूं. प्रभे, आज पाहुण्यांच्या बरोबर चौपाटीवर हिंडावयास जा, मला आज क्लबांत जावयाचें आहे. "

अितक्यांत फोनची घंटा झाली. " क्षमा करावी, आणखी आठ दिवस येतां येत नाहीं. गाडींतून अुतरतांना पाय लचकल्यामुळें चालवत नाहीं. नारायण. "

" बरं आहे. " प्रभेनें फोन खालीं ठेवला. प्रभेनें आज ड्रायव्हरला रजा दिली व ती नारायणरावांसह फिरावयास निघाली.

प्रभा मोटार चालविण्यांत फार कुशल होती. तशीच रसिक कवयित्री होती. कॉलेजांत अुत्तम वक्त्री म्हणून प्रसिद्ध होती. सौंदर्य, शालीनता, संपत्ति व सदाचार या चतुष्टयाचें माहेरघर आज नारायणरावांच्या सेवेला सादर होतें. हँगिंगगार्डन मधील अेका बाजूच्या बाकावर बसून सूर्यास्ताचा देखावा पाहत असतांना शशिशेखर कवीची अेक कविता प्रभा गुणगुणू लागली. नारायणरावांना अुभ्या जन्मांत सुंदर कुमारिकेजवळ अेकांतांत बोलण्याचा प्रसंग आला नव्हता. पण आपलीच कविता गुणगुणाऱ्या प्रभेला त्यांनीं विचारलें कीं, " हे कवि तुमच्या परिचयाचे आहेत का ?"

" कवि शशिशेखर हे हौशी कवि अ ..."

" कशावरून ?"

" कधीं तरी सटीसहामासी अेखादी सुंदर कविता प्रसिद्ध करतात म्हणून ! महाराष्ट्रांत आज गवताप्रमाणें होणाऱ्या कवितेच्या वाढीत यांची कविता रसिकांना जास्त आवडेल असं माझं मत आहे."

"तुम्हीं त्यांना प्रत्यक्ष पाहिलें आहे काय ?"

"नाहीं; काव्यगायनाचे दौरे काढणाऱ्या कविबुवांपैकीं ते नाहींत,

किंवा स्वतःचा फोटो मासिकांत देत नाहींत; त्यामुळें मी त्यांना नांवानेंच ओळखते." प्रभा म्हणाली.

नारायणरावांच्या मुखावर स्मित झळकूं लागले. अत्यल्प परिचयामुळें फारसा धीर होत नसल्यामुळें नारायणराव म्हणाले: "ही कविता आपण म्हणून दाखवाल कां ? अुपकार होतील."

प्रभेच्या गोड आवाजानें नारायणरावांची तंद्री लागली होती. आकाशांत चंद्राची कोर झळकत होती. विद्युद्दीपांनीं मुंबापुरी सजली होती. अनपेक्षित सुखसागरांत पोहणारे नारायणराव स्वतःची कविता गोड कंठांतून अैकतांना अुल्हसित झाले होते. तोंच थोडीशी धडपड, धावपळ व अेक अस्पष्ट किंकाळी त्याना अैकू आली. बागेच्या कोपऱ्यांतील झाडाआड कांही तरी गडबड होती. नारायणरावांनी तिकडे धांव ठोकली. दोन पारशी विद्यार्थिनी अेका पठाणाच्या तावडींत सांपडून धडपडत होत्या. पठाणाच्या हातांतला तळपणारा सुरा पाहून त्यांचें तोंड बंद झालें होतें; व तो नराधम त्यांच्या जवळील दागिने, घड्याळे व पैसे लुबाडीत होता. हे पाहतांच नारायणराव विद्युत्वेगानें धांवत गेले व त्यांनी त्या पठाणाला आपल्या हातांतील काठीच्या रट्ट्यानें खाली लोळविलें.

त्या मुली गाडीत बसल्या. 'चला वकीलसाहेब,' प्रभा ओरडली. अितक्यांत चवताळलेला पठाण अुठला व त्यानें आपला सुरा नारायणरावांच्या पाठीत भोंसकला. थोडक्यांत चुकलें, तो त्यांच्या बरगडीला चाटून गेला. नारायणरावांनी पठाणाच्या नाकावर गुद्दा लगावला तों पठाण खालीं पडला. नारायणरावांना कष्टानें मोटारीजवळ ओढून प्रभेनें आंत कोंबलें. अितक्यांत गर्दी झाली, पोलिस आले. त्या गर्दीत पठाण पसार झाला व नारायणराव मूर्च्छा येअून पडले. चार दिवस तापांत कधीं कविता तर कधी विमा यावर नारायणराव बडबडत असत. अेक मोटार दाराशीं येअून अुभी राहिली. अेक काळेसावळे गृहस्थ थोडेंसें लंगडत खालीं अुतरले व त्यांनीं आपलें व्हिजिट-

कार्ड आंत पाठविलें. ' नारायण कुलकर्णी. अेम्. अे, अेल्. अेल्. बी. ' प्रभा आंत रोग्याजवळ बसून कविता वाचीत होती तोंच हें कार्ड गड्यानें आणलें. तिनें खिडकींतून पाहिलें व कपाळाला थोड्या आठ्या घातल्या.

आलेले गृहस्थ दिवाणखान्यांत बसले तोंच त्यांचें लक्ष अेका हँड-बॅगकडे गेलें.

' नारायण कुलकर्णी, अेम्. अे. अेल्. अेल्. बी. '

' नारायण कुलकर्णी अेम्. अे. अेल्अेल्. बी. ' हें नांव वाचून त्यांनाही आश्चर्य वाटलें.

' रामा, पाहुण्यांना चहा दे व बाबा बाहेर फिरावयास गेले आहेत म्हणून सांग.' प्रभेनें आंतून सांगितलें.

' नमस्कार, काय काम आहे आपलं मजकडे ?' बाबासाहेब बाहेरून येत म्हणाले.

' मी आपल्या केससंबंधी आलों आहें. पूर्वी फोन केलाच होता.' पाहुणे म्हणालें.

' माफ करा, मला विमा वगैरे कांहीं अुतरावयाचा नाहीं. आपण व्यर्थ तसदी घेअू नका. ' बाबासाहेबांनीं तुसडेपणानें अुत्तर केलें.

' कसं काय आहे आतां वकिलसाहेबांचं ? जखम मिळून आली कीं नाहीं प्रभा ?'

' यासंबंधीं आपला पूर्वी पत्रव्यवहार झाला आहे. ' पाहुणे घुटमळत म्हणाले.

' यासंबंधीं मला जास्ती बोलावयाची अिच्छा नाहीं. विमाअेजंट म्हणजे चिकट जळूंच आहे! '

' अहो, पण मी विमाअेजंट नाहीं, मी वकील आहें. ' असें म्हणून आपलें कार्ड त्यांनीं बाबासाहेबांच्या हातांत दिलें. बाबासाहेब आश्चर्यचकित झाले. अितक्यांत बाहेर फिरावयास निघालेलीं नारायणराव व प्रभा बाहेर आली. त्यांची व पाहुण्यांची नजरा-

नजर होतांच " अरे तुम्हीं कुणीकडे ? " असे उद्गार दोघांच्या मुखांतून बाहेर पडले.

'अेकाच नांवाचीं दोन माणसं, दोघेही पुणेरी वकील, म्हणून हा घोंटाळा झाला.' असें म्हणून प्रभा फिरावयास गेली.

* * * *

वकील आले तसे हात हलवीत परत गेले व विम्याचें काम करावयास आलेले नारायणराव मुंबअीलाच घरजांवअी होअून राहिले.

स्वयंवर पाहावयास नारायणराव अेकदांक सपत्निक गेले असतांना त्यांचे स्नेही वामनराव भेटले व म्हणाले, 'कां हो, हातची केस गमावलीत पंचवीस हजारांची ! ठरल्या वेळीं आलां नाहींत. बहुतेक विसरलां असाल. विमाअेजंटांनीं अशी हलगरज करूं नये.'

'बरं, पुन्हां येअीन.' असें म्हणून नारायणराव मोटारींत बसले.

'विमा अेजंटाचं काम करतांना घर चुकलं म्हणून–' प्रभा म्हणाली.

'पंचवीस हजारांची केस गेली !' नारायणराव म्हणाले.

# ६

# केडसर कायको

## स्त्रीहृदयाची कुचंबणा हेंच रतनच्या छद्मवेशाचें कारण नव्हे का ?

**ते मला** प्रथम बघायला आले तेव्हां किती पण मला धन्यता वाटली ! मीं मनाशीं म्हटलं याचं नांव सुशिक्षितपणा. आओबापांनीं वधू पसंत करण्याचं खूळ अजून नामशेष झालं नाहीं, पण सुशिक्षित माणसांनीं असाच पायंडा पाडायला पाहिजे वधूपरीक्षणाचा.

स्वभाव तरी त्यांचा किती गोड ! वोलणं चालणं तरी कसं अगदीं दृष्ट लागेल असं. साधी राहणी अन् अुच्च विचारसणी. सुपारीच्या खांडाचं सुद्धां व्यसन नाही. पोषाक तर अगदीं साधा. काळया कुळकुळीत केसांवर पांढरी स्वच्छ खादीची टोपी. अुंच बांधा आणि निमगोरा वर्ण, हंसतांना दिसणारे स्वच्छ सुंदर दांत, शर्टचं वरचं बटण अुघडं, आंतून डोकावणारं पांढरं स्वच्छ माळेसारखं जानवं, डबल ब्रेस्टचा खादीचा कोट आणि तुळतुळीत धोतराचा काचा मारलेला. अलिकडे सुशिक्षितांची निशाणी म्हणून मानला गेलेला चष्मा नाहीं किंवा हातांत मनगटी घड्याळही नाही. मला तर अगदीं ' रूपं तदोजस्वि तदैव वीर्यं तदेव नैसर्गिकमुन्नतत्वं ' या श्लोकाची आठवण झाली बाओ.

त्यांनीं जेव्हां बाबांना हंसत हंसत सांगितलं कीं, मी दुसऱ्याकरितां मुलगी बघावयास आलों आहें तेव्हां मात्र मला फार राग आला. त्यांनीं मला अेकसुद्धां प्रश्न विचारला नाहीं. मला वाटे त्यांनीं माझ्याशीं कांहीं तरी बोलावं. त्यांनीं सांगितलं असतं तर मी त्यांना

अेक : ड गाणंसुद्धां म्हणून दाखवलं असतं, पेटी वाजवूनहि दाख असती, पण त्यांनीं फक्त अेकदांच माझ्याकडे पाहिलं व म जर त्यांच्यावरून हलेना. ते म्हणाले: ' मुलगी पसंत आहे. ांना आनंद झाला. आअीनं वराचं वय विचारलं, पहिलीं मुलं किती, पगार किती ? तिचंहि समाधान झालं. याद्या झाल्या. दोन्ही बाजूंचा खर्च त्यांनींच करायचा. कार्य पुण्यांत व्हायचं.

पण मला कोणी माझं मतहि विचारलं नाहीं. आअीबाबा पुढल्या अुद्योगाला लागलीं. मी मात्र माडीवर जाअून रडत बसलें. ते अर्ध्या वाटेंत गेलेले परत आले व बाबांनीं त्यांना वर पाठवून दिलं. आकाशाकडे पाहत त्यांनीं मला विचारलं ' हें स्थळ तुम्हांला पसंत आहे ना ? हा पाहा फोटो. वय चाळिशीच्या आंत आहे. पहिला फक्त अेक मुलगा आहे. घरदार, शेतीभाती मोठी आहे ! ' मीं तो फोटोहि पाहिला नाहीं. मी त्यांच्याकडे पाहत होतें. ते म्हणाले, ' तुमचं मत कोणीच विचारलं नाहीं हें मला आवडलं नाहीं. तुम्हांला सुख लागेल याची मी हमी घेतों.' मी त्याच्याकडे चमकून पाहिलं. ते जमिनीकडे दृष्टी लावून बोलत होते. किती तरी वेळ माझ्या तोंडांत तो प्रश्न घुट मळत होता, पण विचारण्याचं धाडस होअीना. शेवटीं माझी मूकसंमति घेअून ते निघून गेले. मी किती तरी वेळ त्यांचाच विचार करीत होतें. माझ्या भावी पतीसंबधीं विचारहि माझ्या मनाला शिवला नाहीं.

लग्नसमारंभाची सगळी व्यवस्था त्यांनीं किती छान ठेवली होती. कुणाला काम नाहीं, त्रास नाहीं, दगदग नाहीं. मोठ्या पहाटें अुठून रात्रीं निजानीज होअीपर्यंत सगळं काम ते अगदीं शांतपणानं करीत. त्यांनीं अुभ्याअुभ्या अनशापोटीं पाणी प्यावं. स्वस्थपणं चार घास खायला सुद्धां त्यांना सवड कधींच मिळाली नाहीं. माझा जीव तीळ तीळ तुटे. अेकदांचं माझं लग्न लागलं. सभोंवार ते सारखे वावरत होते. त्यांच्यावर माझी दृष्टि खिळून राही. माझ्या पतींना वाटे कीं, मी फार लाजाळू आहे. मला दागिन्यांनी मढवून काढलं, सगळ्यांनीं

माझ्या रूपाची स्तुति केली. आओबाबांना धन्यता वाटली. समारंभ मोठ्या थाटानं झाला. पैसा पाण्यासारखा खर्च झाला. वरातीनंतर दिवसाचा हिशेब ते लिहीत बसले होते आणि मी कोपऱ्यांत अुभी राहून त्यांच्याकडे मनमुराद पाहत होतें. सासूबाओी प्रेमानं म्हणाल्या, 'बैस खालीं. आतां किती वेळ अुभी राहणार तूं?' जो तो माझी विचारपूस करी, लक्ष्मी घरीं आणली म्हणून माझ्या पतींचं अभिनंदन करी, पण मानेवर खडा ठेवल्याप्रमाणं ते रात्रंदिवस काम करीत होते. त्यांची कोण विचारपूसही करीत नसे, हें पाहून मला राग येओ. पण जन्मांत कधी कुणावर रागावलेलं मीं त्यांना पाहिलं नाहीं. माझे पति शरीरानं स्थूल असून केंसाळ होते. ते सब्‌जज्ज असल्यामुळें त्यांची अुद्दाम अधिकारी वृत्ति स्पष्ट दिसे. नोकरावर ते वाटेल तसं तोंड टाकीत; पण त्याच्या अुलट त्यांना कधीं लोकांवर खेकसणं माहीत नव्हतं. नंतर मला कळलं कीं, ते धंद्यानें डॉक्टर आहेत. माझ्या पतींच्या ओंठावर मिशांचे कल्ले होते, तर त्यांच्या ओंठावर केंसांचा मागमूसहि नव्हता. ते शरीरानं सुटसुटीत होते व स्वभावानं फार प्रेमळ होते. त्यांनीं माझ्याकडे अेकदां तरी बघावं असं मला फार वाटे; पण त्यांचं लक्ष कामांतून निघेल तर ना!

दुसऱ्या दिवशीं आम्ही पुण्याहून परत बेळगांवाला जाणार होतों. पाहुणेमंडळी कोणी सिनेमा तर कोणी पर्वती तर कोणी पुलावर अशी बाहेर गेलीं होतीं. सगळ्यांचं देणंघेणं संपवून ते नुकतेच बैठकीवर बसले होते, तोंच माझे पति म्हणाले, 'अरे केशव, अुद्यां आह्मी जाणार तर बर्थस्‌ वगैरे रिझर्व करण्याची तजवीज कर, चुकूं नकोस.' 'बरं आहे' म्हणून त्यांनीं कपडे घातले व ते स्टेशनवर निघाले. माझ्या पतींचा या वेळीं मला फारच राग आला, पण चुरमुरे खात स्वस्थ बसणं मला भाग होतं! त्यांच्याबद्दल वाटणारी आस्था मीं कशी दाखवावी! चटकन्‌ माझ्या मनांत विचार आला कीं, आपण पुढं होअून त्यांना म्हणावं 'निदान थोडासा फराळ करून तरी जा'

स्टे...' ते अपेयपान अगर अभक्ष्यभक्षण करीत नसत हें मला क... तं. मरेमरेतों काम करावं, पण त्याची कुणाला दाद आहे? 'बि... वर टेंकतात न टेंकतात तोंच पुन्हां हुकूम सुटला! त्यांच्या-ब... ा कां बरं प्रेम वाटत होतं? माझे पति जर लग्नानंतर कुठं चु... असते तर त्यांना कांही मी ओळखूं शकलें नसतें; पण त्यांना म... ार माणसांतून क्षणात ओळखून काढलं असतं. त्यांच्याकडे न ब... ी त्याचं पाऊल ओळखू लागलें. चालतांना ते वहाणा खरडत ख... चालत.

... क्लासांत सामान ठेवण्याच्या धांदलींत ते होते. नांवाला वर्तमानपत्रें हातांत धरून मी त्यांच्याकडे पाहत होतें. मात्र किती पण अवधानं संभाळावीं लागत! माझ्या पतीची नजर मधून मधून माझ्याकडे वळे. ती चुकवून अितर कोणी माझी नजर कुठं आहे हें पाहत नाहीं ना अशी खात्री करून मग त्यांच्याकडे पाहायचं. पाहुण्यांची रवानगी करून दिल्यावर आम्ही फक्त तिघंच स्टेशनवर राहिलों. वडिल माणसं व मुलं पुढं पाठविलीं होती.

'केशव, सगळ्या लग्नांत तू फार दमलास बुवा. तूं नसतास तर हें कार्य सुरळीत पार पडलं नसतं.' सेकंड क्लासांतल्या गादीवर बसून माझे पति बोलत होते. प्लॅटफॉर्मवर ते अुभे होते. ते फार गोड हंसले. 'तुला फार श्रम झाले.'

त्यांनी माझ्या पतींना आंत येअून नमस्कार केला तोंच शीट झाली. ते दार लावून जरा दूर झाले आणि मी मोठ्यांदा किकाळी फोडली. माझे पति घाबरले व ह्मणाले, 'काय झालं?'

'माझं पोट फार दुखतंय्'...मी विव्हळत म्हटलं.

सिग्नल पडला. गाडी सुटणार तोंच ते म्हणाले, 'केशव, चढ वर, ... ...ोत. तिचं पोट दुखतंय.'

गाडी सुरू झाली. ते माझं पोट चाचपून पाहत होते. मी डोळे ...केले करून जरा विव्हळत होतें. 'कांही विशेष नाहीं' असें ते ...रात.

म्हणालें तरी मी सपाटून विव्हळत होतेंच. नाविलाजानं त्यांना आमच्याच डब्यांतून प्रवास करावा लागला.

गाडी अंधारांतून वेगानं धांवत होती. शेवटीं माझे पति घोरूं लागले. त्यांनीं खिशांतून दोन पांढऱ्या गोळ्या काढून मला दिल्या. तोंड बाहेर करून मीं त्या थुंकून टाकल्या. मी त्यांच्याकडे पोट भरून पहात होतें. 'वहिनी, बरं वाटतं ना आतां?' असं त्यांनीं विचारलं. मानेनं नकार दर्शवून मी स्वस्थ पडलें होतें. माझ्या समोरच्या कांचेच्या तावदानांत त्यांचं प्रतिबिंब पडलं होतं तिकडे मी पाहत होतें. क्षणभर त्यांनीं माझ्याकडं पाहिलं आणि त्यांचे डोळे पाण्यानं डबडबले !

## —२—

माझी नूतन पत्नी वेडी आहे हें मला बेळगांवास आल्यावर कळलं. अितकं सुंदर रूप असून वेडसरपणामुळं त्याची माती व्हावी हें माझं दुर्दैव, दुसरं काय ! तिचा वेडसरपणा सहजासहजीं लक्षांत येणंही जरा कठिणच आहे. पुण्यांत तर मला ती वेडी असेल अशी शंकाहि आली नाहीं. अजूनसुद्धां ती धोंडे मारीत नाही, किंवा शिवीगाळ करीत नाहीं. चारचौघीजणींप्रमाणं पोषाक करते. अितर वागणंहि तिचं वेडसरपणाचं वाटत नाहीं. कधीकधीं ती आपल्याशीच गाणं गुणगुणे ! पण तिला गायन–वादनाची आवड आहे हें मला कळलं होतं म्हणून कांहीं विशेष वाटलं नाहीं. गाडींत तिचं पोट दुखूं लागलं. नंतर मिरजेपर्यंत आमच्या केशवनं तिला औषध दिलं व तिला बरं वाटलंसं दिसलं म्हणून मिरजेहून तो परत गेला.

बेळगांवीं आल्यावर पहिले दोनचार दिवस आमची मनमोकळे-पणानं गांठ पडली नाहीं. पण सर्व व्यवस्था नीट झाल्यावर जेव्हां तिला मीं रात्रीं प्रथम पाहिलं तेव्हां मला भीतीच वाटली. पलंगावर ती बसली होती व आपल्याशींच हंसत होती. मी दिसतांच कांहींतरी

संस्‍ ोक ती गुणगुणूं लागली. मला जरा चमत्कार वाटला म्हण ' तिला नांव घेऊन हांक मारली. तेव्हां तिनं मोठ्या चम क नजरेनं माझ्याकडे पाहिलं आणि पुन्हां ती हंसूं लागली. जव ून तिच्या डोळ्यांना मीं पाणी लावलं आणि तिला पुन्हां हां ली, तों ती क्षणभर स्वस्थ बसली. नंतर ताड्दिशीं जागे- वर ळली व खिडकीत अुभी राहिली व मोठ्यांदा म्हणाली, ' मार्गवशादुपेतं स्त्रोतोवहा सागरगामिनीव ।' हा कुठला श्ल आतां मला नक्की आठवत नाहीं. पुन्हां पटकन् ती मजजवळ ये ाली आणि दिव्याकडे पाहत पुन्हां हंसूं लागली. माझ्या बोलण्याकडे तिचं लक्षच नव्हतं. तिचं तारुण्य लोभनीय वाटत होतं आणि तिची वेडसर स्थिति अनुकंपनीय वाटत होती.

दुसऱ्या दिवसापासून मीं तिच्या हालचालीवर बारकाअीनं नजर ठेवली. ती जेवतांना विचित्रपणा करी. बोटाची चाळवाचाळव करी. डोळे मुरडी, स्वतःशीच पुटपुटे. केसरी अुलटा वाची. तर कधीं होल्डरनंच लिही. हळूहळूं सर्वांनाच कळून चुकलं कीं, सुंदर आणि वेडी मुलगी पदरात बांधून आम्हाला व्याहयांनीं फसविलं. केशवला व्यवहार-ज्ञान फारस होतं असं मला कधीच वाटलं नाही ! पण त्यानं सांगितलं की, प्रथमवराला सुद्धां मुलगी हवीशी वाटेल अशी आहे. म्हणून तर मी ताबडतोब संमति दिली.

 स्थितींत चार महिने गेले. अुगीच हें लोढणं गळ्यांत बांधून घे सं वाटूं लागलं. शेवटीं तिला अुपचारासाठीं वेडयाच्या अि ळांत पाठवावं असं ठरलं. माझ्या संसाराचा खेळखंडोबा  केशव मेंटल् हॉस्पिटलमध्यें आज तीन चार वर्ष होता. याला प्रथम दाखवावं आणि मग काय तें करावं असं मीं . आश्चर्याची गोष्ट अशी कीं, केशवनं तिच्या तंत्रानं घेत घेत  पुष्कळ ताळ्यावर आणलं. ती त्याच्या म्हणण्याप्रमाणं अगदीं

निमूटपणं वागे. तो असतांना ती जरा सुधारल्याप्रमाणं वाटलं. तिची चर्या अुल्हसित दिसे.

त्याची रजा संपली आणि तो निघून गेला. तिला घरींच ठेवावं असं त्याचं मत पडलं. तिच्या मर्जीविरुद्ध आम्ही कधींच वागत नव्हतों. पण ती पुन्हा अुदास दिसूं लागली. तिचं वेड वाढीस लागलं. तिला संभाळतां संभाळतां आओीचा जीव मेटाकुटीस आला. कधीं ती मूठ भरून पैसे भिक्षा वाढी, कधीं गंभीरपणं टाअिम्स वाची. पण तिचं अन्न तुटत चाललं. मुद्रा काळवंडली. आणि तिच्याबरोबर रात्रीं अेकटं राहण्याची मला भीति वाटू लागली.

शेवटीं अेके दिवशीं रात्रीं बाहेर पाअूस धो धो पडत होता. अंधार काळाकुट्ट पडला होता. घरांतल्या माणसांना झोपेनं घेरलं होतं. आणि तिनं गांवाशेजारच्या खंदकांत जाअून जीव दिला. सकाळीं पाण्यावर तिची वस्त्रं तरंगत होतीं, चपला कांठावर पडल्या होत्या, ब्लाअूझहि कांठावरील दगडाला अडकून फाटलेला दिसत होता. अवघ्या सहा महिन्यांतला हा खेळ ! तिचं प्रेत मात्र सांपडलं नाही. पावसाच्या जोरानं तें वाहून गेलं असं पागबुडे म्हणाले.

—३—

शीख लोक लांबलचक केंस राखतात, हे मला माहीत होत; पण ते अितके सुंदर असतात अशी माझी कल्पना नव्हती. मेंटल् हॉस्पिटलमध्यें आल्यापासून माझ्या खास दिमतीला अदलून बदलून पुष्कळ नोकर होते; पण हा शीख मुलगा कांहीं औरच होता. कां बरं मला त्याच्याबद्दल अितकं प्रेम वाटतं ? त्याचा चेहरा मी कुठं पाहिल्याचं आठवत नाही. त्याच्याअितके आज्ञाधारक व दक्ष नोकर मिळतील तर नोकरी कांहीं जड जाणार नाहीं. रात्रीं बेरात्रीं केव्हांहि हांक मारा, कधीं कुरकूर नाहीं. कामाशिवाय बोलायचा नाहीं.

अिंग्रजी किती सफाअीनं आणि छान बोलतो. त्याला मराठी मात्र नीट बोलतां येत नाही.

परवां पुन्हां दादाचं पत्र आलं कीं, दुसरी अेकादी मुलगी पहा. मीं साफ नकार दिला. वेडाच्या भरांत वहिनीनं जीव दिला हें अेक आश्चर्यच आहे ! मला तरी वहिनी वेडी दिसली नाहीं. मीं तर पाहून पसंत केली तिला. परस्त्रीकडे पाहायची मला संवय नसल्यामुळं मी वहिनीची चेहरेपट्टी नीट सांगू शकत नाही. पण— जाअू द्या. आतां कशाला तो विचार.

तिला प्रथम बघायला गेलों तेव्हां अेक स्वार्थी विचार मनाला चाटून गेला. पण दादांच्याकरितां गेलों मुलगी पाहायला आणि स्वतःच पत्करली तर लोकांनी नांवं नसतीं का ठेवलीं ? वहिनी कधीं मनमोकळं करून माझ्याशीं बोलली नाही. गेली बिचारी ! आणि दादा दुसरी मुलगी पाहूं लागले ! जग म्हणजे काय वेड्यांचा बाजारच आहे कीं काय ? या मेंटल हॉस्पिटलमधील प्रत्येक वेडा स्वतःला शहाणा समजतो व अितर शहाण्यांना वेड्यांत काढतो ! बाहेरच्या जगाच्या बाजारांत तरी हीच तऱ्हा. दादांना चाळि-शीच्या घरांत तिसऱ्या लग्नाची भाषा सुचते, तर पंचविशीच्या घरांत असून माझ्या पहिल्या लग्नाला पत्ता नाहीं !

मी विचार करीत होतों. बाहेरच्या व्हरांड्यांत रतनसिग बसला होता. मला रतनचं कां बरं वेड लागलं आहे ? तो नोकर असून मला वाटतं कीं, मालकाप्रमाणं आपण त्याची चाकरी करावी. त्याचा तो डोक्यावरील कधीहि न निघणारा फेटा, काळा मांड-चोळणा, घट्ट कपांचा कमरेखालीं रुळणारा सैलसा सदरा, पायांतील चढाव, हंसतांना दिसणारे सुंदर दांत, अुंच आणि सडपातळ बांधा, गौर वर्ण. जनलज्जा आड आली नसती तर मीं त्याला अेकाद्या फुलाप्रमाणं वागविलं असतं. वाटतं जाअून त्याचा घट्ट हात पकडावा. त्याच्याशीं घटकाघटका बोलत बसलं तरी वेळ कसा गेला तें समजत

नाहीं. त्याला राग येअील म्हणून त्याची नजर चुकवून वा...
लागतं. संक्रांतीला त्याला मी प्रेमानं तिळगूळ दिला आणि त...
डोळे आनंदाश्रूंनीं भरून आले. कांहीं विचारलं तर नुसता हूं...
आज तीन महिन्यांचा पगार मजजवळ पडलाय. पुरुष जातीला अितकं मोहक सौन्दर्य किती पण खुलून दिसतं !

माझे अितर नोकर दोन दोन महिन्यांनीं बदली करून घेत. आज आठ महिने झाले, त्याची कधीं बदली होअील या कल्पनेनंच माझ्या अुरांत धस्स होतं ! रतनचा वशिलाहि मोठा दिसतोय. पगारांत वाढ आणि बदलीचा त्रास नाहीं. मला परवांच मुंबअीकडल्या अेका डॉक्टरनं सांगितलं, हेड ऑफिसांत त्याचा चांगला वशिला आहे. आमच्या वहिनींच्या मामांनीं त्याला नोकरीवर लावला.

मला काम नसलं म्हणजे मी त्याच्याबरोबर मनमुराद गप्पा मारतों. त्याला घेअून बाहेर हिंडायला गेलं म्हणजे लोक त्याच्याकडे टकमक बघत राहतात. त्याच्या शेजारी अुभं राहून सौन्दर्य आणि कुरूपता यांची चालतींबोलतीं चित्रें जगाला पाहायला मिळतात म्हणून आम्ही गच्चीवर किती तरी बोलत बसतों. मला लग्न करूं नयेसं वाटूं लागलं आहे. सगळा जन्म रतनसिंगाच्या गोड सहवासांत घालवायला मिळाला तर काय बहार होअील ! त्याला मराठी वाचतां येत नव्हतं. निदान तो तरी अिंग्लिश वर्तमानपत्रंच वाची.

बेळगांवच्या प्लेगांत दादांनीं टोंचून घेतलं नसल्यामुळं त्यांचा बळी पडला. तें पत्र वाचून मला फार वाअीट वाटलं लहानपणापासून त्यांनीं माझा सांभाळ केला होता. पत्र टेबलावर पडलं होतं. मला काम असल्यामुळें मी गडबडीनं डिस्पेन्सरींत गेलों. परत आलों तेव्हां रतनसिंग डोळे पुशीत होता. त्याला मीं कितीतरी परीनं विचारलं ! पण त्यानं प्रत्युत्तर दिलं नाहीं.

त्या रात्रीं मला नीटशी झोंप आली नाहीं. बाहेरच्या खोलींत मी

डोकावलं तो रतन बिछान्यावर बसून रडत होता. मीं त्याला हांक मारली. तावदानाचं दार अुघडून त्यानं माझ्या पायांशीं लोळण घेतली. मीं त्याला धरून वर अुठविलं आणि माझ्या अंगावर शहारे आले !

मान खालीं घालून रतन अुभा होता. केंस कमरेच्या खालीं लोळत होते. पातळ सदऱ्यांतून त्याचं तारुण्य प्रतीत होत होतं. खालीं मान घालून अुभा असलेला तो रतन नसून अेक नवयौवना असावी असा मला भास झाला !

रतनला मी कितीतरी हांका मारल्या तरी तो बोलला नाहीं. त्याच्या डोळ्यांतून अश्रू वाहत होते.

माझ्या बंगल्याबाहेर अंधार पसरला होता. रात्रीची वेळ! समोर रतनच्या स्वरूपांत अुभी असलेली स्त्री ! मी जरा भांबावून गेलों! तावदानी खिडक्यांवर पडदे ओढले. दुसरा दिवा लावला आणि जिवाचा धडा करून अवनत मुख करून अुभ्या राहिलेल्या रतनचं तोंड वर केलं.

क्षणांत मी माझ्या कॉटवर बसलों ! रतनची दृष्टि मला वेडाच्या भरानं जीव दिलेल्या वहिनीच्या दृष्टीप्रमाणं भासली. मी डोळ्यांवरून हात फिरविला. रतन हा छद्मवेषधारी स्त्री तर नव्हे, अशी शंका येण्यास वावच नव्हता. मीं त्याच्याकडे निरखून पाहिलं ! न कळत माझ्या तोंडून शब्द गेले ' वहिनी. '

रतननं माझ्या गळ्याला मिठी मारली– ' अैशी प्रेमाची जाती । लाभाविणें करी प्रीती ' वहिनी गुणगुणत होती.

लौकरच माझी बदली पुण्याला झाली. विधवेबरोबर विवाह केल्याबद्दल वृत्तपत्रांनीं माझं अभिनंदन केलं.

(मनोहर–मार्च १९३४)

# ७

# पुरुषांची जात

## शांतेचा संशय कसा दूर झाला ?

'**पुरुषांची जातच** अशी' शांतावहिनी रागानें पुटपुटली. पुन्हा ती कान देऊन अैकूं लागली. आंत कोणी तरी बोलत होतें. मधून कपबशांचा आवाज व हास्याचे फवारे. वहिनी मात्र रागानें बाहेर थरथर कांपत होती.

'मी कॉलेजांत गेलों आणि ती प्रथम माझ्या खोलींत आली, तेव्हांपासून मला तिचें वेडच लागलें. तिच्याशिवाय मला करमेनासें झालें. वर्गांत तिला नेतां येत नव्हतें, पण खोलींत परत आलों कीं, विरहाची भरपाअी करी. चांदण्या रात्रीं तर अेकमेकांच्या सहवासांत आमचा वेळ फार आनंदांत जाअी. सिनेमाला जातांना तर अितरांना चुकवून मी फक्त तिलाच घेअून जाअी. तिची सेवा करण्यांत होणारा ब्रह्मानंद तुम्हांला काय सांगूं ? अरे, तिला स्नान घालून तिची वेषभूषासुद्धां मीच करीत असे' आंत मंडळींच्या हास्याला पूर आला होता.

'चारपांच वेळां तिच्या थोरल्या बहिणीची ओळख झाली. प्रत्येक वेळीं चांगलाच खड्ड्यांत आलों. तिचा खर्च कांहीं झेपेना. जास्त पैसे घरून कोण पाठविणार ? तेव्हां तिचा नाद सोडूनच दिला.'

'मग आतां कसं होतं रे, शशी ?' अेकानें वचारलें.

'वहिनींना खपतं कां हें ?' दुसरा म्हणाला.

'तिला कळवीन तर ना मा ! ...ीशी सवड सांपडली तर आम्ही गुंगारा देतोंच तिला. ...ावाय ती आज दुपारच्या मोटारनें जाणार साताऱ्याला; मग कोण मला आडव्ळा आणणार?

'पाहूं दे तरी आम्हाला अेकदां ती' मिस्किलतपणें अेक अुद्गारला.

'अं हं:, आजकाल तर ती अगदीं असूर्यंपश्या झाली आहे; कारण तिच्याकडे बघायला मला दिवसा सवड कोण देतोय ?'

'पण सनद घेतल्यावर मग कसं होणार ?'

'तिची सर्वांत थोरली बहिण फार खर्चिक आहे म्हणे. वकिली चांगली चालली तर तिलाही आणूं घरांत ! त्यांत काय आहे मोठेंसें ?'

'म्हणजे ? तुला वहिनीपेक्षांहि ती नेहमी जवळ असावीशी वाटते ! कमाल आहे बुवा तुझी ! '

'करमतच नाहीं तिच्यावांचून आतां. कॉलेजांत जाण्यापूर्वी मी तिच्याकडे आशाळभतपणानें पाही. पण बाबांची भीति वाटे त्यावेळी. आतां काय ! '

'मन:पूतं समाचरेत्' बसल्या बसल्या त्याच्या मित्रांनी शशीच्या पाठीवर थाप मारली व बाहेर वहिनी जमिनीवर कोसळल्या.

'काय ग झालं वहिनी ? आणि रडतेस ग कां ? माहेरीं जायचं म्हणून कीं काय ? दादा येअीलच मागून सासुरवाडीला' तिला हाताला धरून नेतांना अुषा वन्स म्हणाल्या.

कांहीं अेक प्रत्युत्तर न देतां वहिनीनें आपल्या खोलींत जाअून पलंगावर अंग टाकलें. तिकडे मित्रांच्या बरोबर गप्पा मारतांना शशी रंगांत आला होता. सातताली हंसण्यानें घर नुसतें दणाणलें होतें.

जेवतांना सूनबाई कांहीं बोलली नाहीं. पानावर बसून नुसती अुठली म्हणून आअीनें जास्ती चौकशी केली, तों तिनें डोकें दुखतंय म्हणून सांगितलें.

## –२–

वडिलांची मदत असल्यामुळें सनद काढल्यापासून शशीला काम चांगलें मिळत गेलें. त्याचा हजरजबाबीपणा व समयसूचकता त्याला फौजदारी खटल्यांत फार फार अुपयोगी पडलीं. पांचसहा महिन्यांतच पूर्वसंकल्पाप्रमाणें त्यानें अेक छोटीशी ब्यूक कार विकत घेतली. त्यामुळें तिची धाकटी बहीण आतां अर्थातच मागें पडली ! नवा अुत्साह आणि वाढतें काम, मग कोणता होतकरू वकील कामाची अळंटळं करील ? आणि फौजदारी खटल्याला ना सण ना वार ! घरची गाडी असल्यामुळें त्याला जिल्ह्यांत वेळी अवेळीं फिरून काम करणें शक्य होतें.

अुद्यां संक्रांत म्हणून वहिनी हलव्याला केशरी रंग देअून झोंपण्याच्या तयारींत होती; तोंच दाराशीं गाडी थांबली. शांतेच्या चेहऱ्यावर आनंदाची कळी अुमलली. कोणी तरी धडधड जिना चढून वर येत होतें. दार अुघडतांच कावरा बावरा झालेला शशी म्हणाला, ‘ चल, वाढ लवकर, जेवायला सुद्धां फुरसत नाहीं ’– पण शांता निमूटपणें खालीं गेली. त्यानें कपडे काढले व तो खालीं जेवायला गेला. जेवण कसलें तें ! चार घास घशांत टाकले आणि वर येअून त्यानें कपडे केले.

‘आतां दोन दिवस अगदीं सवड नाही अं. परवां येअीन बहुतेक; रागावूं नकोस बुवा अशी’ पायऱ्या अुतरतांना तो म्हणाला.

खिडकींतून शांतेनें पाहिलें तों गाडीत दुसरें कोणी तरी होतें. कोणी तरी कुजबुजलेलें अैकूं आलें.

‘वकीलसाहेब, आपली फार मेहेरबानी आहे. ’

मोटार सुरूं झाल्यावर आंतलाही दिवा लागला. आंत अेक अवगुंठनवती स्त्री बसलेली दिसली. शशी आंत बसतांच शोफरनें गाडी सुरू केली. डोळ्यांत तरंगणारे अश्रू पुसून शांतेनें धाड्दिशी खिडकी लावून घेतली.

' पैशाचं प्रेम न ... मार ? ' शांतेनें पलंगावर अंग टाकून म्हट...

समोर ... ला शशीचा फोटो, ... मुख चेहरा, प्रेमळ दृष्टि आणि विनोदी वृत्ति पाहून तिला ... अस्थानीं आहे असें वाटे, तर त्याचें प्रत्यक्ष वर्तन पाहून ... नोरा येअी. अश्रूंनी अुशी भिजली, पण तळमळणाऱ्या शांतेला ... नाहीं.

' शशी आला होता काय ग, सूनबाअी ? ' आपल्याच ... गुरफटलेल्या तिला हा प्रश्न अैकूं आला नाहीं.

' पोर न जेवताच गेलं वाटतं ! हिला तर झोंप लागलेली दिसते, अन् झोंप तरी कशी येते गाढ देव जाणे ! ' सासूबाअी पुटपुटल्या.

सतत आठ दिवस खपून, अविश्रांत श्रम करून शेवटी शशीनें खटला जिंकला व मोठा मेहेनताना घेअून शशी आनंदानें घरीं आला. आतां महिनाभर बाहेरगांवची केस घ्यायची नाही व शांतेचा राग काढायचा या मनोराज्यांतच त्यानें घरी पाअूल ठेवलें. तो तडक माडीवर गेला तों काय—शांतेचा हंसतमुख चेहरा स्वागताला अुभा नव्हता. शशीनें अेक सुस्कारा टाकला. ' अुषे ' त्यानें माडीवरून हांक मारली.

' कळलं, कळलं काय विचारणार आहेस तें. वहिनी गेली साताऱ्याला काल संध्याकाळीं. '

' कां ? '

' तिच्या भावाचं लग्न ठरलंय पुढल्या महिन्यांत नाशकाला. '

' मग अितकी गर्दी काय झाली होती ? '

' अन् दादा, तुला तरी पैसा मिळवायची अितकी गर्दी कां झाली आहे रे ? जातांना वहिनी रडत होती. पैशाच्या नादानं तूं प्रेम मात्र हातचं घालवशील. '

कपाळावरचा घाम पुशीत शशी अुषेकडे पाहत होता. अुषा फणकाऱ्यानें खालीं चालली होती.

तोंच फोनची घंटा वाजली. तिनें रिसीव्हर घेतला.

' कोण आहे ?, '

' मी, अुषा'–

' अुषा ! '

' ओ, गुड लक् ! सकाळीं यायचं कबूल केलं होतंस तूं. अेक तासांत नाहीं आलीस तर मी येअीन न्यायला.'

' ओ. के. ' हंसत हंसत अुषेनें अुत्तर दिलें.

' आअी, जातें ग बाअी मी घरी; नाहीं तर रागवायचं होअील. ' अुषेनें झटपट घरीं जाण्याची तयारी केली. व्हरांड्यांत सुन्न डोकें झालेला शशी येरझारा घालीत होता. त्याच्यासमोर अुषा गाडीतून घरीं गेली. त्या भयाण खोलींत शशी स्वस्थ पडला होता.

' अरे, जेवायचं नाही कां तुला ? कामापुढं तुला कांही सुचतं कीं नाहीं ? '

' हं आलोंच खालीं, आअी ' –

–३–

' खटल्याचा निकाल झाला, अन् भर कोर्टांत तिने शशीच्या गळ्याला मिठी मारली. '

' आं. कमाल आहे बुवा ! '

' अरे बाबा, याला नशीब लागतं. मी या शशीला कॉलेजापासून पाहतोंय, बेट्याचे ' स्टार्स ' नेहमीच जोरांत. आमच्या क्लबांत अेकदां पैज लागली. त्या वेळीं सुलोचना नांवाची अेक विद्यार्थिनी सीनिअरमध्यें नवीन आली होती. तिला हलवा द्यायचा होता. हा शशी आपला सरळ गेला संक्रांतीला त्यांच्या वसतिगृहांत आणि दिला हलवा आणि वरती चहा झोडून आला. शिवाय गोड गोड थँक्स् मिळाले ते निराळेच. हा शशी म्हणजे अगदीं और आहे! '

# पुरुष ची जात

नाशिकचा गंगाकांठ म्हणजे बँकबेची संक्षिप्त आवृत्तीच. फरशी-वर तीनचार तरुण वकील गप्पा मारीत मारीत चिवड्याचा समाचार घेत होते. फिरावयास आलेली शांता शशीचें नांव अैकतांच थबकून तेथेंच रेंगाळत होती. कपाळाचा घाम पुसण्याचें निमित्त करून तिनें रुमाल डोळ्यांवरून फिरविला.

' शांते, दमलीस कां काय ? कां ग मागं राहिलीस ? अग बाअी, जांवअीबुवा की काय ? '

शशीनें मागें वळून पाहिलें व सासूसमोर येअून त्यानें नमस्कार केला.

' लग्नाचा मुहूर्त गांठला असता पण कामच निघालं फार. आतांच आलों पुण्याहून तुम्ही नदीवर गेलांत म्हणून कळलं.'

पतीची नजरानजर होतांच शांता दुसरीकडे पाहाण्याचें ढोंग करूं लागली आणि शशी हंसला.

' रामालाच निघालांत ना? मग गाडीतूनच जाअूं. ' तिघेजण गाडीत बसली. समोरच्या आरशात शांतेचें प्रतिबिंब दिसत होतें तिकडे तो टक लावून पाहात होता.

रामाचें दर्शन घेतल्यावर सासूबाअी पायीच जाते म्हणाल्या म्हणून मोटार पंचवटीकडे वळली. शांतेला स्तब्ध पाहून शशीनें विचारलें,

' मूक व्रत केव्हां घेतलं ? ' मोटार थांबवून तो म्हणाला. शांतेनें तोंडाला खीळ घातली होती, पण डोळे भरून आले होते. तिचे हात आपल्या हातांत घेअून तो म्हणाला ' माझ्याकडून चूक झाली असेल तर क्षमा मागायला मी तयार आहें. '

' चूक माझ्याकडेच आहे ' कातर स्वरांत ती म्हणाली.

' मग क्षमाही केली मी ! '

' मी आपल्या सुखाच्या आड आलें–'

' सुखाच्या आड ? माझ्या ? शांते काय म्हणतेस तें मला नीट कळत नाहीं.'

'नाहींच कळायचं. वेड घेऊन पेडगांवाला गेल्यावर- कॉलेजांत प्रथम ओळख झालेल्या त्या धाकट्या बहिणीला विचारावं किंवा कोर्टांत गळ्याला मिठी मारणारीला विचारावं. आपण होऊन हलवा नेऊन द्यायला मी काय सुलोचना थोडीच आहें? या आपल्या ओळखी–तिथं माझं म्हणणं कसं कळणार?'

'सुलोचना? हं, हं. ती होय? कोण सांगतं तुला या गोष्टी?'

'खऱ्या आहेत ना! मग झालं तर! कुणी का सांगेना?'

'अन् तुझा त्यांच्यावर विश्वास बसतो?'

'हातच्या काकणालाहि आरसा लागतो वाटतं? आज लग्न संपून गेल्यावर यायला सवड झाली हेंच भाग्य!'

पंचवटींत गंगायमुना वाहूं लागल्या.

'कसल्या संशयपिशाच्चानं तुला पछाडलं आहे! माझ्या हृदयाची तुला काय कल्पना होणार? कामाच्या धांदलींत–'

'का प्रेमाच्या धांवपळींत?'

'कसलं प्रेम? कुणाचं प्रेम?'

'राग कांहीं यायला नको. मी होऊन कधीं विचाल्रंय का?'

'विचारल्यावर सांगणं भागच आहे. पण कुणाचं प्रेम?'

'प्रथम धाकट्या बहिणीचं कॉलेजांतलं प्रेम, नंतर मोटारींतल्या बुरखेवालीचं, नंतर भरकोर्टांत गळ्याला मिठी मारणारीचं– कां अेक का दोन, किती म्हणून सांगूं?' शांता चवताळून बोलत होती आणि शशी मोठ्यांदा हंसत होता.

शांता जास्तीच चिडली. तिच्या गालावर अेक चापटी मारून शशी म्हणाला, 'ही बघ तिची थोरली बहीण. हिचं नांव ब्यूक. आणि हा बघ त्या मिठी मारणारणीचा फोटो. अेक दत्तकाची केस जिंकली व म्हातारीनं आनंदानं मला मिठी मारली. बघ त्या सुरकुत्या, आणि ते केसांचे वाख. तीच त्या रात्री मोटारींत होती.

शांता आश्चर्यानें आ वांसून शशीकडे पाहात होती.

'झाली खात्री?'

शांतेनें शशीच्या खांद्यावर मान टाकली.

 (मनोहर–जून १९३४)

दोघांनीहि अेकमेकांना पाहिलें. फार मोठ्या कष्टानें तिनें तोंडून बाहेर पडणारा आश्चर्योद्‌गार दाबला. तो तर क्षणभर जागेवर अुभाच राहिला. दुसराहि सेट त्यानें जिकला. त्याला आज आपल्या कौशल्याचे चीज झालेंसें वाटलें. शेवटी बॅक हॅड व्हॉली घेतांना त्याचा पाय घसरला व त्याची ती गेम गेली. ' फाअिव्ह वन फॉर मि. विद्याधर '. तो हंसला. शेवटची त्यानें सर्व्हिसगेम घेतली. टाळ्यांच्या कडकडाटांत त्याचा जयजयकार झाला. मित्राचें अभिनंदन स्वीकारीत पराजित प्रतिस्पर्ध्याबिरोबर मनमोकळेंपणानें गप्पा मारीत मारीत तो आपल्या खुर्चीवर येअून बसला. तो त्या वर्षीचा चँपियन ठरला.

' वेल प्लेड ' ती सहज स्फूर्तीनें म्हणाली.

' थँक्स ' त्यानें सस्मित अुत्तर दिले.

सामन्यात मिळालेले कप्स् आणि शील्ड बॉयच्या ताब्यांत देअून त्यानें मित्राच्या घोळक्यातून कोर्टाच्या कोपऱ्याकडे पाहिलें तों ती तेथें दिसली नाही. त्याचा चेहरा हिरमुसला. त्याच्या सभोंवार जमलेला अभिनंदनोत्सुक मित्राचा घोळका पाहून तिनें हळूच बाहेर पाय काढला होता. त्याचे डोळे तिला सर्वत्र शोधीत होते.

* * * *

' ओहो, ' ती आनंदानें ओरडली. ' काय ग झालं शरयू ? ' वाऱ्याने अुडणारी छत्री सावरीत त्याने विचारलें. ' बाबा हेच ते. ' तिच्या चेहऱ्यावर आनंद नाचत होता. ' कोण हे ? ' रेनकोटाची कॉलर गळ्यावर चढवीत त्यानें विचारलें ' साप मारला ते. ' त्या विद्यार्थीनें ओल्या रुमालानें कपाळावरचें पाणी पुसलें. पुण्याचा पावसाळा आणि छत्री न घेतां फिरायला गेलेला. तो विद्यार्थी ओला चिंब झाला होता तरी अगदीं बेफिकिर होता. ओळख करून दिल्यावर नमस्कार चमत्कार झाले. साहजिकच त्याला घरीं चलण्याबद्दल आग्रह झाला. घरी पोंचेपर्यंत त्यानें आपलें वृत्त कथन केलें. अिंजे-

निअरिंग कॉलेजच्या शेवटल्या वर्षात तो विद्यार्थी होता. घरचा साधारण गरीब, अंगावर खादीचा पोलो कॉलरचा शर्ट, गळ्यांत माळेसारखें पांढरें शुभ्र जानवें, धोतराचा काचा, पायांत मद्रासी चपला. केसांच्या भांगावर जलबिंदू खेळताहेत, शरीरयष्टि कणखर आणि मुद्रा जरा रांकट. काळ्या सावळ्या पण फार मोहक चर्येवर नेहमीं चमकणारें हास्य. अशा वर्णनाच्या त्या विद्यार्थ्यानें पुनः अेकदां त्या बंगलीत प्रवेश केला

'अन्, टेनीस पण छान खेळतात हे. परवां त्यांना शील्ड मिळालें सामन्यांत' ती साभिमान म्हणाली. त्याला सुके कपडे घालावयास दिले आणि आग्रहानें त्याला जेवावयास ठेअून घेतलें. जेवणाची तयारी होअीपर्यंत फोनो चालला होता. ती त्याच्याकडे पाहाण्यांत गुग होती. तो बंगलीचें निरीक्षण करीत होता. स्वयंपाकिणीकडून तिनें त्याला आग्रहानें वाढलें. जेवतांता तिची हकिगत त्याला कळली. तिचे वडील विधुर असून मिलिटरी अकौंटस्‌मध्यें बडे पगारदार होते. बोलतां बोलतां तो अगदीं जवळच्याच क्वार्टर्समध्यें राहतो असेंहि तिला समजलें.

"फार अुपकार आहेत बोवा तुमचे आमच्या शरयूवर" त्याला निरोप देतां देतां तिचा बाप म्हणाला. तो विद्यार्थि नुसता हंसला. रस्त्यानें चिखल होता व पाअूस झिम झिम पडत होता. आपला रेनकोट तिनें त्याच्या अंगावर टाकला. व हातांत छत्रीहि दिली.

"सवडीअतीं अुद्यां परत करा" तिनें म्हटलें.

"थँक यू" त्यानें व्हरांड्यांत पाअूल ठेवलें.

"गुड नाअिट" आरामखुर्चीवर पडल्या पडल्या ते प्रौढ गृहस्थ अुद्‌गारले. गडबडीनें शरयूनें आपली बॅटरी त्याच्या हातांत दिली. तिची ती दक्षता पाहून त्याला मौज वाटली.

"गुड नाअिट" फाटकांत अुभी राहून ती म्हणाली.

"गुड नाअिट" रस्त्यावरून आवाज आला.

* * *

न्यायाधिशानें धन्योद्गार काढले. आणि भर कोर्टात त्यानें त्याला दोषी ठरवून २।। वर्षे सक्तमजुरीची शिक्षा सांगितली. त्याचें हास्य विषादपूर्ण होतें.

*            *            *

सरकारी बागेंत गुन्हेगार कैदी काम करीत होता. अुन्हाची वेळ. वॉर्डर झाडाखालच्या सावलीत गप्पा मारीत पडले होते. कैदी बिचारे बागेंत सारखे खपत होते. जमीन अुकरणें, पाणी घालणें असलीं कामें करतां करतां एक कैदी भोंवळ येअून पडला. त्याचा घुणा फुटला ह्मणून त्याला जेलच्या दवाखान्यांत आणला, तेव्हां डॉक्टरसाहेब आपल्या नूतन परिणीत पत्नीसह फोनो अैकत, शीतपेय पीत, आराम करीत होते. त्यांच्या अैषआरामात विघ्न आलें म्हणून ते कैद्याला शिव्या देतच अुठले. सहज प्रकार काय आहे म्हणून पाहण्यासाठी त्यांची पत्नीहि अुठली. तों व्हरांड्यांत आणून टाकलेल्या कैद्यानें डोळे पूर्ण अुघडले. ती दचकली व दाराआड झाली. “ पक्का बदमाश आहे हा कैदी ” डॉक्टरसाहेब पत्नीला सांगत होते. तिचे डोळे पाण्यानें डबडबले होते. “ किती मायाळू आहेस तूं ? अग, ह्या रामोशानं अेका कुमारीची अब्रू घेतली म्हणून बसलाय आतां तुरुंगांत खडी फोडीत. त्याच्याकरितां तू कशाला रडतेस ? जा रे याला येथून घेअून.”

“गुन्हेगार तो कैदी की मी ?” ती पुटपुटली.

कैद्याला घेअून वॉर्डर नजरेआड झाले.

(मनोरंजन, फेब्रुवारी १९३४)

# १

# भुताटकी

शिरीषच्या हंसऱ्या मुद्रेवर चिंतेचें जाळें पसरलें होतें. 'आम्हांला आज वाङ्मयविशारदाची जरूरी नाहीं, मुंबई विश्वविद्यालयाचे बी. अे. असलांत तर विचार करूं' हे शब्द त्याच्या कानांत सारखे घुमत होते. जनसमूहानें गजबजलेली, प्रासादासारख्या अनेक अिम।रतींनी नटलेली आणि विद्युद्दीपांनी चकाकणारी मुंबापुरी त्याच्यासारख्या भणंग भिकाऱ्याला साहरा वाळवंटाप्रमाणें वाटली.

अुपहारगृहांतून चमचमीत भोज्य पदार्थांची लयलूट होती आणि शिरीषच्या पोटांत जठराग्नि पेटला होता व खिशांत तर पैहि नव्हती. चित्रपटगृहांत हौशी प्रेक्षकांचा नुसता तोबा अुडाला होता. शिरीषनें भिंतीवरील चित्रफलकांवरच नजर टाकून तहान भागविली. भाग्यवान श्रीमंत मोटारींतून धांवत होते आणि नोकरीसाठी वणवण हिंडून शिरीषच्या पायांत गोळे आले होते.

त्या बोलघेवड्या देशभक्तांच्या वाक्पटुत्वाला भुलून शिरीषनें कॉलेजला रामराम ठोकला आणि राष्ट्रीय विद्यालयांतून ' वाङ्मय-विशारद' ही पदवी मिळविली. त्यांपैकींच अेका प्रोफेसरांनीं लागलीच पगडी फिरवून अेका सरकारी कॉलेजांत वशिला लावून नोकरी पटकावली आणि ते मोटारींतून त्याच्यासमोरूनच गेले व त्यांच्या बेगडी देशभक्तीनें फसून कॉलेज सोडलेला शिरीष आज अन्नाला महाग झाला होता.

चाळींतल्या कोपऱ्यांतील खोलींत आल्यावर शिरीषनें बसकरा-वर अंग टाकलें. अेक जीर्ण वळकटी, फळीवरची पुस्तकांची रांग,

काळे पांढरे दगड, आणि. नकलेचें अितर साहित्य, कोपऱ्यांतील खुंटीवर लटकणारी सतार याशिवाय खोलींत दुसरें सामान नव्हतें. अेका पैशाशिवाय शिरीषजवळ तारुण्य, सौन्दर्य, आनंदी वृत्ति व विनोदी स्वभाव पुष्कळ होता. डोक्यांत विचारांची गर्दी होअून डोकें भणभणावयास लागल्यामुळें शिरीषनें सतार काढली. कलावंताच्या कुसरीनें रुक्ष परिस्थितीवर ताण केली शिरीषची बोटें सफाअीनें सतारीवरून फिरत होतीं. तोच वरच्या मजल्यावर दाणादाण आणि आदळआपट सुरू झाली. जणूं कांहीं कोणी तरी वर नाचतच होतें. कधीही न चिडणारा शिरीष बाहेरच्या ग्यालरींत आला आणि वर पाहूं लागला तोंच वरून केळ्यांचीं सालें, संत्र्यांच्या साली, बदामांची टरफलें बरोबर त्याच्या डोक्यावर पडली. धांवतच तो वरच्या मजल्यावर गेला तों त्याच्या वरच्या खोलींत हंसण्याला नुसता अूत आला होता. दारावर त्यानें दोन लाथा मारल्या. धाड्दिशी दारें अुघडली. दारांतच अुभा राहिलेला शिरीष, त्याच्या डोक्यावरील वाऱ्यानें अुडणारे केस, अस्ताव्यस्त भांग, हाफशर्टच्या आंतून दिसणारी त्याची पिळदार शरीरयष्टि आणि डोळ्यांत न मावणारा राग पाहून खोलींतील व्यक्ति जरा हसतांना थांबल्या. आंतल्या व्यक्ती त्याला नीटशा दिसल्या नाहीत; कारण तो गॅलरींतच अुभा होता. आंत सर्व स्त्रियाच आहेत हें पाहिल्यावर त्याला राग आवरून धरणें भाग पडले. ‘ साली खालीं टाकतांना जरा पाहात जा ’ शिरीष गुरगुरला. खोलींत मंदस्मिताची झुळुक अुठली. ‘ तुमच्या अंगावर पडल्या की काय साली ? ’ अेक कुमारी मिस्किलपणें हंसून म्हणाली, ‘ व्हेरी सॉरी, अेक्स्क्यूज. ’

परत येअून त्यानें पुन्हां सतार घेतली. दोनचार गती वाजवून तो सतारीत रंगून गेला होता. तों पुन्हा वर आदळआपट सुरू झाली. त्यानें शांतपणें सतारीला गवसणी घातली, कपडे घातले व तो चोपाटीकडे निघाला. सतारवादनानें पोट थोडेंच भरणार आहे !

खानावळीचें थकलेलें बिल द्यायचें होतें. खोलीच्या भाड्याची नोटिस आलेली होतीच. नोकरीसाठीं पायपिटी करून दमला, तरी कोणी थारा देअीना. विल्सन कॉलेजसमोरील अेका बांकावर तो हताश चित्तानें बसला होता. त्याच्यासमोरून मोटारींची शिवाशिव चालली होती. चौपाटीवर जगाचा छोटा बाजारच भरला होता. पण तिकडे आज त्याचें लक्ष गेलें नाहीं. फेसाळणाऱ्या समुद्राकडे तो पाहत होता. क्षणभर त्याच्या मनांत आत्मघाताचे विचार घुटमळू लागले तो रडतराअू नव्हता. पण आशावाद तरी कुठवर धीर देणार? त्याच्या शेजारीं हौशी लोकांच्या मोटारी अुभ्या होत्या. कोणी हवा खात होते. पण शिरीषला आज हें कांही दिसत नव्हतें. अुद्यां खोली खाली करावी लागेल, खाणावळवाला पोटाला घालणार नाहीं. कोरलेली चित्रें आणि आवडती सतार विकूनसुद्धां भाड्याची भरती होणार नाहीं. अुभ्या जगांत हात देअील असा कोणी मित्र नाही. नामधारी नातेवाअीक पैशाचे सोबती!

हळूहळू शिरीष चाळीकडे वळला. चांदणें स्वच्छ पडलें होतें. जरा कमी रहदारीच्या वाटेनें विपण्ण मनानें तो चालला होता. मागून अेक मोटार भर्रकन् आली आणि क्षणार्धांत दृष्टीआड झाली. थोड्या अंतरावर रस्त्यावर कांहीं तरी पडलें आहे असें त्याला वाटलें. तो जरा द्रुत गतीनें गेला आणि पाहिलें तो कोणाचें तरी पैशाचें पाकीट. झटकन् तो खालीं वांकला. पण लागलीच जरा घुटमळला. चार पावलें पुढें गेला. दारिद्र्य आणि धनलाभ यांच्या कात्रींत तो सांपडला होता. तो पुन्हां परत फिरला व त्यानें तें पाकीट अुचललें. रस्त्यावर कोणीहि नव्हतें. पाकीट पुन्हां रस्त्यावरच टाकून जावें असें त्याला वाटलें. शेवटीं तो खोलीत आला आणि मोठ्या अुत्सुकतेनें त्यानें पाकीट अुघडलें.

'सदानंद शीलवंत सॉलिसिटर, वाळकेश्वर, मुंबई' त्याला पाकिटांतलें तें व्हिजिट कार्ड दिसलें. आंत शंभर शंभरांच्या पांच

नोटा होत्या. किती तरी वेळ तो त्या नोटांकडे पाहात होता. किती तरी बरे वाईट विचार त्याच्या मनांत येऊन गेले. शेवटी नळाचें पाणी पिऊन त्यानें खोली बंद केली. जीर्ण बिछाना पसरला. उशाला तें पाकीट जपून ठेवलें. मुंबईत असे कित्येक अभागी जीव दररोज अर्धपोटी झोंपी जात असतील !

—२—

'मग, पाकीट सांपडलं अन् नोटा काय झाल्या ? '

'चोरीला गेल्या. सकाळी येथें आलों तेव्हां आपण बाहेर गेलां होता. अन् दुपारी माझ्या खोलीतून कोणी तरी नोटा नेल्या.'

'चोरी करून वर ती पचविण्याचा तुमचा उद्देश दिसतो.'

सॉलिसिटर शीलवंत आपल्या बंगल्यांत बसले होते. त्यांनीं बटन दाबून घंटा वाजविली. नोकर आल्यावर त्याला सांगितलें की, या माणसाला चौकीदाराच्या ताब्यांत दे. शिरीषचे डोळे रागानें लाल झाले.

'मला चोरी पचवावयाची असती तर मी आपल्यापुढें आलोच नसतों. माझ्या प्रामाणिकपणाला हेंच बक्षिस काय ? '

'तुम्ही आलांत म्हणून तर आम्ही तुम्हांला विचारतों. नाही तर आम्हांला कसें कळलें असतें ? '

नोकर पुढें सरला. शिरीष गरजला :

'तुमच्या नोटा कोणी तरी चोरल्या हें सत्य आहे. तुम्ही चौकशी करा. आज संबंध दिवसांत माझ्या पोटांत अन्नाचा घास नाही. वाटल्यास खात्री करून घ्या.'

'पैशाकरितां वाटेल त्या थापा मारतां येतात,' सॉलिसिटरसाहेब तोऱ्यांत म्हणाले. त्यांचा नोकर पुढें सरला व त्यानें शिरीषचे हात पकडले. त्याच्या हातून आपला हात हिसकून शिरीष कळवळून म्हणाला:

'माझ्या प्रामाणिकपणाबद्दल आपली कशी खात्री करूं? वाटल्यास आपले पैसे फिटेपर्यंत मी आपल्याकडे फुकट नोकरी करतों. पण मला नाहक तुरुंगांत डांबू नका!'

'नोकरी? कसली नोकरी करणार? काय येतं तुम्हांला?'

'मी वाङ्मयविशारद आहें.'

'अूं:, करायचाय काय वाङ्मयविशारद? मुंबअीचे बी.अे. असता तर गोष्ट निराळी. बरं, दुसरं काय येतं?'

'सतार वाजवितां येते, शिल्पकला येते. दगडी मूर्ति, पुतळे कोरता येतात.' खालीं पहात शिरीष म्हणाला.

'बरं', अुद्यांपासून माझ्या मुलाला शिल्पकला शिकवा. तुमच्या सतारीची आम्हांला जरूर नाही. आमचे पैसे फिटले म्हणजे तुम्हांला रजा देअू.'

'बरं, फार आभारी आहें आपला.' शिरीषनें जातां जातां म्हटलें. बंगला सर्व सुखमोयींनी भरलेला दिसला.

'पण तुमचा पत्ता काय? हो, फरारी झालांत तर करा काय?'

'सदानंद चाळ, दुसरा मजला, खोली १० वी.'

'बरं, या अुद्यांपासून.' अुठतां अुठतां शीलवंत म्हणाले.

दमलाभागलेला शिरीष खोलींत आला तों आश्चर्यचकितच झाला. त्याच्या मागें कोणीं तरी खोलींत येअून फराळाचा डबा भरून ठेवला होता. हा काय भुताटकीचा प्रकार आहे असा विचार करीत करीत शिरीषनें सपाटून त्यावर ताव मारला. त्या रात्रीं तो गाढ झोंपी गेला. दुसऱ्या दिवसापासून तो शीलवंतांच्या मुलाला शिकविण्यास जाअू लागला. शिकवणी सकाळची होती. पुन्हां तोच प्रकार! परत आल्यावर खोलींत त्याच्या अंगाला येण्याजोगे अुत्तम कपडे–धोतरजोडी, कोट, शर्ट, टोपी, हतरुमाल कोणीं तरी ठेवलेले आढळले. शिरीषला या भुताटकीचा कांहीं अर्थ कळेना. त्याच्या खोलींत दोन्ही बाजूंनीं पक्क्या भिंती होत्या, वर कडीपाट होता. आपल्या मागें कोणी दार उघडून येतो

कीं काय अशी त्याला शंका आली. तिसऱ्या दिवशीं भाडयाच्या पावत्या खोलींत आणून ठेवलेल्या आढळल्या. दररोज कांहीं ना कांहीं नवा पदार्थ खोलींत आढळून येअी. त्या वेळीं मुंबअीत मायामच्छिंद्रावर रसिकांच्या नुसत्या अुड्या पडत. पण शिरीषच्या जवळ एक पै सुद्धां नव्हती. रोज खोलींत फराळाचा डबा भरून येअी. पण त्याच्या शिल्प-कलेला गिऱ्हाअीक कधीं तरी मिळे! आज मायामच्छिंद्राला जातां येअील तर काय बहारच होअील या विचारानें त्यानें खोली अुघडली तों सिनेमाचें पहिल्या वर्गाचें तिकीट त्याला आढळून आलें. ही काय भुताटकी की आपण अेखाद्या कल्पवृक्षाखालीच बसलों आहोंत ! मोठ्या आनंदाने शिरीष सिनेमाला गेला. कीलोतला राणीच्या सिंहासनाचा देखावा त्याच्या मनांत फार भरला व तो देखावा त्याने दगडावर कोरण्याचें ठरविलें. विश्रांतीच्या वेळांत त्याला शीत पेयाचा पेला व चॉकोलेटस् हॉटेलच्या पोराने आणून दिले. पैसे न मागतांच तो निघून गेला. शिरीषला अत्यंत आश्चर्य वाटलें ! घरीं गेल्यावर त्याने तो देखावा कोरण्यास प्रारंभ केला. कांही दिवसांनीं तो देखावा पुरा झाला व साफसुफी झाल्यावर त्यानें तो विकण्याचें ठरविलें. शिकवणी करून आल्यानंतर पाहातों तों देखावा कोरलेल्या दगडाचा पत्ता नाही. फक्त त्याची किमत काय अशी पृच्छा केलेली अेक चिठ्ठी त्याला दिसली. त्यानें त्या चिठ्ठीवर योग्य ती किमत लिहून ठेवली. आतांपर्यंत त्याच्या अज्ञात मित्राने त्याला प्रत्यक्ष पैसा दिला नव्हता, म्हणून दुसऱ्या दिवशीं अुत्सुकतेनें त्यानें खोली अुघडली तों पांचपांचाच्या वीस नोटा ठेवलेल्या आढळून आल्या. ही खास भुताटकीच असावी असें त्याला वाटलें. पण जर आपला फायदा होतो आहे तर कशाला कमी करा, म्हणून शिरीष आनंदांत होता. त्याच्या शिकवणीनंतर त्याला पुष्कळ वेळ सांपडे. त्या वेळीं तो शिल्पकामें करी. सॉलिसिटर शीलवंतांचा पहिला ताठरपणा आतां पा[illegible]सा झाला होता. त्याला लागणाऱ्या गोष्टी त्याचा अज्ञात

मित्र बिनचूक पुरवीत असे. शेवटीं हा काय प्रकार आहे याचा छडा लावण्याचा त्यानें एके दिवशी निश्चय केला. जो कोणी खोलींत येत असेल तो शिकवणीच्या वेळांतच येणें शक्य होतें. म्हणून त्यानें एक युक्ति योजली व भुताटकीचा छडा लावला.

—३—

'सुधे, कमाल आहे तुझी! प्रणयाराधनाची ही नवीनच पद्धत काढली आहेस तू !' अुषा म्हणाली.

'अग, माणसाची प्रथम परीक्षा करावी लागते. स्वारीला प्रथम मीं अेका क्यूरिओ शॉपमध्यें पाहिलं. त्यांच्याजवळ विकाअू संगमरवरी दगडाच्या मूर्ति आहेत, त्यांचा तो सौदा चालला होता. पण तो जमला नाही.'

'मग, तू जमविलास की काय सौदा?'

'नाहीं, मी फक्त मोटारींतून घराचा पत्ता काढला, तो स्वारी आमच्याच चाळीत राहते हें कळल्यावर ही वरची खोली घेतली ताब्यांत. त्या दिवशीं आपण केळ्यांच्या अन् संत्र्यांच्या साली फेंकल्या त्या तुझ्या आहेत ना लक्ष्यांत?'

'अन् ती पाकिटाची काय भानगड झाली नंतर?'

'मींच तर मुळीं पाकीट टाकलं मुद्दाम! मागं स्वारी आहे हें मला माहीत होतंच. आणि नोटाही लांबवल्या मींच.'

'आणि आळ आणला त्या बिचाऱ्यावर!'

'पण त्या आळानं सोय केवढी झाली? शिकवणीच्या वेळीं मी अिथं सगळी तयारी करून ठेवतें पण स्वारीला आहे कुठं त्याचा पत्ता? आतां अेवढा आरसा खालीं लावून येतें. अजून पुष्कळ वेळ आहे म्हणा? तूं हो पुढं, मी आलेंच गाडींतून तुझ्या पाठोपाठ!'

दिवाळी तोंडावर आली. आज शिरीषच्या खोलीची विशेष साफसफाअी चालली होती. अुद्यां रविवारची सुट्टी म्हणून खाद्यपेयें

खाली ठेवून ती आरशांत जरा पहात अुभी राहिली, तोंच कुणाची तरी पावलें वाजलीं म्हणून झटकन् तिने कडीपाटाचा चोरदरवाजा अुघडला. तोंच शिरीषनें धाड्दिशी दार अुघडलें. एक सुंदर कुमारी कडीपाटांतून वरच्या खोलीत जात होती. थोड्याच वेळात कडीपाट जागच्या जागी बसला. आश्चर्यानें चकित झालेला शिरीष क्षणभर खोलीतल्या साफसफाअीकडे पहात होता. तो द्रुतगतीनें वरच्या मजल्यावर गेला व त्यानें दारावर थाप मारली.

'कम् अिन्' आंतून कोणीसे म्हटलें.

शिरीषने आंत पाअूल ठेवलें तों खोलींतल्या कोचावर बसलेली अेक कुमारी अुठून अुभी राहिली.

'आपल्या खोलीत कल्पवृक्ष आहे काय ?'

'कामधेनूला कल्पवृक्षाची काय गरज ?' तिनें हंसत हंसत विचारलें. तोंडावरचा मिस्कीलपणा, हंसतांना दिसणारे कुंद–रदन, व डोळ्यांतली भिंगरी पाहून शिरीष गोंधळला. 'ही काय भुताटकी आहे ?' शिरीषने विचारलें. तिने फक्त हंसून प्रत्युत्तर दिलें. ती सुंदर होती.

'आमच्या आदळआपटीचा आपल्या सतारवादनाला त्रास होतो म्हणून वर आलांत होय ?'

'माझ्या खोलीत दुसऱ्या माणसांनीं येण्याचें कारण ?'

'आज शिकवणी लौकर संपली वाटतं ?'

शिरीषचा हात धरून तिनें त्याला कोचावर बसविले. क्षणभर त्याच्या अंगावर शहारे आले. तिने कपाटांतून हरवलेल्या नोटा काढल्या.

'या आपल्या हरवलेल्या नोटा!' शिरीषआश्चर्यानें वेडा झाला! त्यानें तिच्याकडे नजर रोंखली.

'चोरी केली तरी पचवितां आली पाहिजे अशी!'

'या सगळ्या घोटाळ्याचा अर्थ काय?'

'भुताटकी!' खाली मोटारचें हॉर्न वाजलें.

'बाबा आले वाटतं.' शिरीषनें खिडकींतून पाहिलें तों सॉलिसिटर शीलवंत मोटारींत बसून चौकीदाराचा सलाम घेत होते.

'चोरी सांपडली म्हणून बाबांना सांगितलं पाहिजे. चल..'

(विविधवृत्त, आक्टोबर १९३३.)

# १०

# अध्यापिका

‘ तो! कोण ग हा तो ? ’ सुधेनें विचारलें.

‘ माझा प्रियकर ! ’ या अुत्तरानें सुधा खो खो हंसू लागली. मीनाक्षी मात्र मिस्किलपणें मंदस्मित करीत होती. पुरुषद्वेष्ट्या मीनाक्षीला प्रियकर असणें शक्यच नव्हतें.

‘ मीना, तुझा प्रियकर ? आश्चर्य आहे! ’

‘ कां ? मला प्रियकर नसावा की काय ? ’

‘ नाही कोण ह्मणतंय? पण सर्रास सर्व पुरुषांवर सडेतोड टीका करण्यांत तुझा हातखंडा! आपल्या वाग्बाणांनीं त्यांना ताडन करण्याची तुला कोण हौस ! आपल्या जहांबाज कोटिक्रमानं त्यांना गप्प बसवून सभेंतून विजयश्रीनं वावरणारी तूं आणि तुला प्रियकर? हां, समजलें. मायामच्छिंद्र पाहिल्याचा प्रभाव कीं काय हा ?’

मीनाक्षी ताड्दिशीं अुठून म्हणाली, ‘ अग जा! पुरुषांच्या माया-जालाला फसणारी मी ती कीलोतला नाहीं. या विसाव्या शतकांतली चांगली पदवीधर आहें मी. मच्छिंद्राचा परमेश्वर आला तरी मी त्याची चांगली हजेरी घेअीन.’ अितक्यांत घंटा वाजली आणि शाळेंतल्या मोलकरणीनें अेक भेटपत्रिका आणून दिली. त्याच्यावरून अेकदां तुच्छतेनें नजर फिरवून ती म्हणाली: ‘ जा, जागा भरली म्हणून सांग. काय मेल्यांचा सुळसुळाट तरी! नुसती जाहिरात द्यायचा आवकाश कीं आलेच मेले धापा टाकीत. या पुरुषांची जातच अशी लाळघोटी! सुधेला यांत नवीन कांहींच नव्हतें.

'तुझ्या रोमरोमीं पुरुषांचा अितका द्वेष खिळला असून तुलाही प्रियकर आहेच पुन्हां ?'

'मग त्यांत काय आहे ? माझ्या मुखाचं बदलतं प्रतिबिंब मी त्याच्या हृदयांत पाहतें. वेषपरिवर्तनहि त्याच्या समोर. दिवसाचा कितीतरी वेळ मी त्याच्या सहवासांत घालवितें. त्याच्या निकट साहचर्यांत मला किती पण आनंद होतो म्हणून सांगूं ?' मोलकरीण परत आलेली पाहून मीनाक्षी म्हणाली.

'गेला का तो अर्जदार ? बकुला !'

'नाहीं. प्रत्यक्ष आपलीच गांठ घ्यायची आहे असं म्हणून ते बाहेर बसले आहेत.' पुन्हां अेकदां भेटपत्रिकेवरून तिनें दृष्टि फिरविली.

'त्याला सांग, मी आतां फार कामांत आहें. भेट व्हायची नाही.' मोलकरीण परत गेली.

'मीना, पुरुषांना अरे जारे म्हणण्याअितका तुला त्यांचा द्वेष कां ? आपण त्यांचा अपमान कां करावा ?'

'मला कीं नाही त्यांचा हा वरचष्मा खपत नाहीं. विद्वत्तेंत काय आपण कमी आहोंत ? पण जिथं तिथं आपले हे पुढं. राजकारण घ्या, वकिली बघा, नोकऱ्या पहा, सगळीकडे आपलं यांचं बंड ! कवींनीं तर अगदीं ताळ सोडलाय. मासिकं यांचीच, नाटककार हेच, वक्तृत्व यांच्याचकडे ऽ' 'ते भेट होअीपर्यंत थांबायला तयार आहेत.' मोलकरणीनें पुन्हां येअून सांगितलें. मीना रागावली. 'बघितलंस ? काय गुर्मी ही ! मी कन्याशाळेची मुख्य अध्यापिका आणि हा मेला अेक अर्जदार ! पण पहा माजुरीपणा ! हटून बसलाय. धोतराच्या निऱ्या करून ठेवायला जरा अुशीर झाला तर डोळे लाल करून बायकोवर नवरेबाजी गाजविणारे हे पुरुष किती अुद्दाम आहेत पहा. घेत नाहीं भेट जा ! कळ्ं ते त्याला कीं, नाही म्हणजे नाहींच.'

'पण पाहीनास त्यांचं काय काम आहे तें ?'

'अग, दुसरं काय काम ? नोकरी द्या. पण मला बी. अेस्. सी. झालेली अेकादी स्त्रीच मिळेल तर मी पाहतें आहें. आणि सकाळपासून पंधरावीस पुरुष येअून गेले !'

'बी. अेस्. सी. झालेली स्त्री ? पुढल्या जन्मीं !'

'हं ! हेंच चुकतं तुझं. पुरुष काय असे स्वर्गांतून पडले आहेत ? आज आम्हीं शिक्षणखात्यांत शिरलोंच कीं नाही ? वैद्यकी-खात्यांत काय थोड्या स्त्रिया डॉक्टर आहेत ? वकिलीलाही स्त्रियांनीं प्रारंभ केला आहेच.'

'पुरे बाई तुझं पुरुषद्वेषाचं पुराण ! जाते मी.'

'पण थांब. तुझं म्हणणंच आहे म्हणून घेतें भेट याची; आणि पहा त्याची कशी फजिती करते ती! मला तर पुरुषांना नामोहरम करण्यांत फार आनंद होतो. जा ग. त्यांना माझ्या ऑफि-सांत नेअून बशीव. सुधे, थांब. मी माझ्या प्रियकराची धांवतपळत आत्तां गांठ घेअून येतें' केंसांवरून हात फिरवीत मीनाक्षी शय्या-गृहांत गेली. सुधेनें सस्मित विचारलें,

'प्रियकर शय्यागृहांतच आहे वाटतं ?'

'नाही तर दुसरीकडे कुठें असणार तो ? चल, तुला दाखवितें माझा प्रियकर किती छान आहे तो!' मीनाक्षी शय्यागृहांतील मोठ्या दर्पणापुढें अुभी राहिली. सुधेला हंसें आवरेना.

'हाच का तुझा प्रियकर ?' मीना केंस नीट बसवीत होती व पातळाची पट्टी साफ करीत होती.

'पण हा दर्पण 'दर्प न' असं तुला सांगतोय?'

'मी अैकलं पाहिजे ना त्याचं? चल बाअी, अेकदां त्याला वाटेला लावून येतें. मग खेळू एक सेट.'

—२—

मोठ्या तोऱ्यानें तिनें ऑफिसांत प्रवेश केला. तो खुर्चीवरून हालला सुद्धां नाही. नखशिखान्त खादीच्या पोषाखांत असलेल्या त्या पाठमोऱ्या अर्जदाराचा अुद्दामपणा पाहून तिच्या चर्येवर क्रोधाची छटा दिसू लागली. तीही मोठ्या ताठ्यानें खुर्चीवर बसली व त्याच्याकडे मुळीच न पाहतां अर्जाची फाअील चाळू लागली.

' बी. अेस् सी.ला विषय कोणते होते ? '

' फिजिक्स, केमिस्ट्री. '

' कामाचा कांही अनुभव ? '

' नाही. '

' हंऽ. पगार काय घेणार ? '

' मिळेल तो. ' मीनाक्षीने कागदांच्या आडून अर्जदाराकडे नजर टाकली आणि ती ताड्दिशी अुठून अुभी राहिली. अर्जदार मात्र स्वस्थ होता.

' तुमचं नांव काय ? '

' आर. आर. रारावीकर. '

' बी. अेस्सी. आहांत ? '

' होय. '

' खोटं बोलायला पण केव्हां शिकलांत ? रारावीकर हे तुमचं नांव नाहीं, तुम्ही बी. अेस्सी.ही नाहीं. हें अितक्या लांब इथं कोणी ओळखणार नाहीं म्हणूनच तुम्हीं हें धाडस केलंत ना ? ' चढत्या स्वरांत ती म्हणाली. त्याचे डोळे मीनाक्षीवर खिळलेले होते.

' असलं असत्य भाषण करणारा शिक्षक मुलींना काय वळण लावील हें दिसतंच आहे. मी अिथं असेन अशी कल्पना नसल्यामुळेंच पुरुषांच्या हाडींमासीं खिळलेल्या अप्रामाणिकपणाचा तुम्हीं अवलंब केलांत ना ? ' तिच्या डोळ्यांत राग मावत नव्हता. तो खुर्चीवरून

अुठलेला पाहून ती मोठ्या कुर्ऱ्यानें म्हणाली :

'आमच्या शाळेंत सत्यवादी शिक्षकच लागतात.'

'बरं. नमस्कार.' तो अुठून चालूं लागला. मुळीच मागें न पाहतां तो तडक रस्त्याकडे वळला. कपाळावरचा घाम पुसण्यासाठींच असेल कदाचित्–अेकदां त्याचा हातरुमाल डोक्यावरून फिरल्याचा तिला भास झाला. मीनाक्षीचे डोळे पाण्यानें डबडबले. बाहेर शाळेची मोलकरीण वावरत होती; आवारांत मुली व्यायामासाठी जमूं लागल्या होत्या. आणि तो अर्जदार रस्त्यावर ठेवलेल्या पायचाकीवर बसून दूर चाललेला तिला दिसला. तिनें डोळे पुसले, कावरी-बावरी झालेली मुद्रा जरा सांवरली आणि कसेंतरी शय्यागृह गांठलें. आपल्या प्रियकरासमोर अुभी राहिलेली मीनाक्षी एका क्षणांत आरामखुर्चीवर कोसळली व ओक्साबोक्शी रडूं लागली. सुधा खिडकींतून बाहेर पहात होती. अर्जदारानें मीनेचा चांगलाच नक्षा अुतरविला असावा म्हणून मनांत ती जरा आनंदली होती.

'मीने, चल, एक सेट खेळूं.'

हळूं हळूं तिनें डोळे पुसले. मानी मीना आज रडत होती. पुरुषांवर वेळी अवेळी कोरडे ओढणारी मीना आज हतप्रभ झाली होती. सुधेनें तिच्या गळ्यांत हात टाकला, डोळे पुसले व केंसांवरून हात फिरविला. 'ज्याच्यावर माझं कॉलेजपासून प्रेम होतं, ज्याला मी मनानं वरलं होतं, ज्याचा सहवास मला फार सुखकारक वाटत होता, त्याची प्राप्ति मला झाली नाहीं. त्याच्याबद्दल मी निराश झाल्यावरच चिडून पुरुषांचा द्वेष करूं लागलें.' ती आकाशाकडे पहात म्हणाली, 'निसर्गनियमाच्या विरुद्ध जाणाऱ्या विक्षिप्त स्त्री-पुरुषांच्या तऱ्हेवाअीकपणाचं मूळ वैयक्तिक प्रेमनिराशेंतच सांपडतं' सुधा शांतपणें म्हणाली. खरेंच आहे. समुद्राकडे जायला वाट मिळाली नाहीं म्हणजे नदीसुद्धां डोंगराच्या खडकाशीं धडक्या देअूं लागते.

'त्याच्या पुनर्दर्शनानं तुझा वरकरणी पुरुषद्वेष विरघळला. अितरां-

वर तोंड टाकणारी तूं—त्यांच्यासाठी आज अश्रु ढाळतेस ! '

'पण मला राग आला तो त्यांच्या खोटेपणाचा. त्यांचं खरं नांव मला माहीत आहे. मायन्स घेअनच ते बी. अे. झाले. त्या वेळीं मी अिंटरमध्यें होतें. या पांचसहा वर्षांत मात्र त्यांची दाद मला नव्हती. अन् मानीपणांत तर माझ्यावर ताण आहे. '

' त्यांचा अिथला पत्ता तरी घेतलास कां लिहून ? '

' नाहीं. अुलट त्यांना मीं वाक्ताडन केलं आणि तेही अुठून गेले. मुधे, बाहेरचा आव निराळा आणि अंतरंगांत तर आग भडकलेली आहे! प्रियकराच्या सहवासाशिवाय जग अुदास भासतं, आयुष्यांत राम वाटत नाही. खोट्या सुखाचं तोंडावर हास्य तर मनांत आग. '

' पण तुझा प्रियकर तुझ्या पुढंच तर आहे. '

' कसला मेला प्रियकर तो ? टाक तो पडदा त्याच्यावर. मी त्यांच्याशीं पूर्वीप्रमाणें गोड कां बोललें नाहीं ? त्यांचा अुपमर्द कां बरं केला ? सुधे, पदवीनं प्रेमाची तहान मुळींच भागत नाहीं. आणि नोकरीनं मनाची आग शमत नाहीं. त्यांचा पत्ता माहीत नाहीं. पण त्यांचा स्वभाव मला माहीत कां नाहीं? ते मानीपणांत माझ्याहून वरचढ आहेत. सुखाचा घांस मीं होअून-दूर सारला. '

—३—

आज वाङ्मयविद्युल्लता नुसती कडाडत होती. वनिताश्रमांत आज 'नवी नीति' या विषयावर मीनाक्षीचें व्याख्यान होतें. श्रोतृगणांत पुरुषही पुष्कळच होतें. तिचें वक्तृत्व अस्खलित होतें. मुद्देसूद कोटिक्रम, बर्ट्रांड रसेलच्या 'लग्न व नीति' (Marriage & Morals), बेन लिंडसेच्या तरुणांचें बंड (Revolt of Modern Youth), मेरी स्टोप्स्च्या तेजस्वी मातृपद (Radiant Motherhood), वगैरे पाश्चात्य ग्रंथांतील आपल्याला पुष्टिकारक तेवढेच विचार, त्यांचीं अवतरणें भाषणाच्या ओघांत ती सहज लीलेनें फेंकत होती. स्त्री

समाजालाच काय पण पुरुषांना सुद्धां तिचें भाषण फार आवडलें. बहुतेक अुपवक्त्यांनीं तिचीच री ओढून हिंदुधर्मांत पुरुषी पक्षपाती धोरण आहे, स्त्रियांचा दर्जा समान झाला पाहिजे वगैरे सांगितलें. शेवटचा वक्ता बोलावयास अुभा राहतांच मीनाक्षीचे डोळे त्याच्यावर सारखे खिळले. 'नांव, नांव !' अशी श्रोत्यांतून पृच्छा होतांच राम रारावीकर, अेम्. अे., बी. एस्सी., असें त्यानें सांगितलें. मीनाक्षी अध्यक्षाकडे आश्चर्यानें पाहूं लागली. अुपवक्त्यानें सप्रमाण मीनाक्षीचा मुख्य मुद्दाच खोडून काढला. पौर्वात्य व पाश्चात्य समाजसुधारकांची आपल्याला अुपयोगीं पडणारीं पक्षपाती तेवढी मतें देअून मीनाक्षीनें श्रोत्यांची मुद्दाम केलेली दिशाभूल त्याने स्पष्ट करून सांगितली. 'सुधारणांची घिसाडघाअी किंवा पुराण मतांवर अंधश्रद्धा या दोन्हीही गोष्टी अनिष्टच. पाश्चात्यांचीं मतें अुपयुक्ततेच्या दृष्टीनें स्वीकारावी; कारण खरें सत्य नेहमीं सुवर्णमध्यांतच (Golden mean) असतें. अशा आशयाचें त्याचें भाषण होतांच सर्वत्र टाळ्यांचा कडकडाट झाला. मीनाक्षीचे डोळे रागानें लाल झाले. अध्यक्ष अुपवक्त्याचा परिचय आपल्या भाषणांत करून देतां देतां मीनाक्षीजवळ आले.

'आपल्या शाळेंत अेका बी. अेस्सी. ची जरुरी आहे ना ?' मीनाक्षीनें होकारार्थी मान हलविली.

'हेही पण नोकरीच्या शोधांत आहेत.'

'आपण आमच्या शाळेचे आधारस्तंभ आहांत. पण मला वाटतं लायक व प्रामाणिक शिक्षकच नेमण्याकडे आपला कटाक्ष असतो.'

'होय.' अध्यक्ष हंसत हंसत म्हणाले.

'मग यांचं नांव रारावीकरही नाहीं आणि हे बी. अेस्सी. हि नाहींत. मग—'

'तुमचा कांहीं गैरसमज तर नाही झाला ?'

'मी यांना चांगली ओळखतें. यांचं नांव वसंत देशमूख, हे बी. अे. आहेत.' अध्यक्ष खो खो हंसूं लागले.

'मला वाटलंच तसं. हें पहा मीनाक्षीबाई, गुदस्तांच यांना राव-बहादूर रारावीकरांनी दत्तक घेतलं आणि यांचं लग्नही ठरवलं. पण मुलगी नापसंत म्हणून त्यांनीं तें लग्न मोडलं आणि अुत्साहाच्या भरांत ते चळवळींत पडले. शेवटी त्यांना ९ महिन्यांची शिक्षा झाली. सुटून येण्याच्या अगोदरच रावबहादुरांनी आपली सगळी अिस्टेट कन्याशाळेला देअून टाकली म्हणून यांना नोकरी शोधणें भाग पडलं. राम हल्ली माझ्याकडंच असतो.' मीनाक्षीनें त्याच्याकडे पाहिलें. तो हसत दूर अुभा होता. श्रोतृवर्ग जवळ जवळ ओसरला होता.

'आपली तशी अिच्छा असेल तर त्यांनी अुद्यां कामावर रुजू व्हावें.'

'राम, अुद्यांपासून तू शाळेंत कामावर रुजू हो.'

'पण, मामा, मी अप्रामाणिक अन् नालायक आहें ?'

'शिवाय शाळेची अध्यापिका कुमारी नसावी असा ठरावच मी आणणार आहें पुढल्या सभेंत.' जातां जातां ते म्हणाले.

मीनाक्षी डोळे पुशीत होती. ती त्याला म्हणाली,

'अन् ठरलेलं लग्न आपण कां मोडलंत ?'

'हें व्हायचं होतं म्हणून.'

'पण माझ्या हाताखाली काम करावं लागेल अं ऽ शाळेंत. आहे कबूल ?'

'O. K.'

तो शांतपणें म्हणाला.

—विश्ववाणी, जुलै १९३४

# ११

# देवमाणूस

'बसा तुम्ही, मी राहतों अुभा.' तो जागा सोडून अडचणीनें अुभा राहिलेला पाहतांच केवळ नाअिलाज म्हणून ती त्याच्या जागेवर बसली. पण तो जरा जवळच बसला असता तर तिला आवडलें नसतें असें नाहीं. तिच्या आभारपूर्ण दृष्टीनें त्याला आपल्या शिलेदारी वृत्तीचें चीज झालेंसें वाटलें.

रोजच्याप्रमाणें आज सुद्धां व्याख्यानाला चिकार गर्दी होती. बर्नार्ड शॉच्या नाटकावर चालू असलेल्या व्याख्यानमालेंत परीक्षेला बसणारे विद्यार्थीच काय पण कॉलेजांत शिकविणारे सर्व अध्यापक, हौशी वकील, वगैरे मंडळी सुद्धां नियमानें येत. व्याख्याते पंडित–प्रकांड असून वक्तृत्व–कलेंत निष्णात होते. आज ' लाअिफ–फोर्स ' वर त्यांची रसाळ रसवंती वेगानें धांवत होती. मधून मधून विद्यार्थिवर्ग महत्त्वाच्या मुद्द्यांचीं टांचणें करून घेत होता. तिच्या वहीवरील नांव दिसावें म्हणून तो तिला संशय न येअील अशा रीतीनें पहात होता. दोन चार दिवसांपूर्वींच तिच्या फाअुटन–पेनांतील शाअी संपलेली पाहून आपलें पेन त्यानें पुढें केलें होतें. व्याख्यानाच्या पहिल्या दिवशीं यदृच्छेनें फक्त त्याच्या जवळच तिला मोकळी जागा दिसली. आज पंधरा दिवस झाले तरी तिची व त्याची जागा अगदीं ठरल्यासारखी होती. बहुतेक तिच्या अगोदर तो येत असे. कोंपऱ्यांतल्या खिडकींत बसलेला तो दिसे. पुढें पुढें जणूं कांहीं तिची जागा त्यानें धरूनच ठेवली आहे अशा रीतीनें ती येअून बसत असे. आज शेवटचा दिवस होता म्हणून अुभे रहावयासही जागा नव्हती. तिला यावयास थोडा अुशीर

झाला. विद्यार्थिनी तर अेका बांकावर चार चार बसल्या होत्या. म्हणून आपण अुठून त्याने तिला जागा दिली. पंधरा दिवसांत दोघेही अेक चकार शब्द बोलले नव्हते. व्याख्यानाच्या वेळीं व्याख्यात्याकडे कान व तिच्याकडे दृष्टि त्याची लागलेली असे. जेव्हां दोघांची चुकून नजरानजर होअी तेव्हां तो लगेच दुसरीकडे पाही. व्याख्यान संपलें. त्याच्या हातांत 'मॅन अँड सुपरमॅन' हें व्याख्यात्यांनी फार प्रसंशिलेलें शॉचें नाटक पाहून तिनें जरा भीत भीत तें पहावयास मागितलें. ती पुस्तक चाळून पहात होती. तो शेजारीं एका प्रोफेसराशीं बोलत अुभा होता. शेवटीं गर्दी कमी होअू लागली. तिनें पुस्तकाचें विहंगम-दृष्टया अवलोकन केलें व शेजारीं पाहिलें तों त्याचा पत्ता नव्हता. पुस्तकाच्या मागेंपुढें पाहिलें तो त्यावरही मालकाचें नांव नाही. जवळ जवळ हॉल रिकामा झाला पण तो कांहीं तिला दिसला नाहीं. त्याचें नांव तिला माहीत नव्हतें आणि तिचें नांव तर त्यानें कधीच विचारलेंही नव्हतें.

हस्ताचा पाअूस आणि मुंबअीचा वारा! ट्रॅम पकडण्यासाठीं जलदानें चालून सुद्धां शेवटी ती हातांतून गेलीच. वाऱ्याने छत्री अुलटी होण्याच्या बेतांत होती. पायांजवळच्या सोग्यांनीं तिच्या पोटऱ्यांना मिठी मारली. डांबरी रस्त्यावरून खळखळ पाणी वहात होतें. तिच्या चपलांचा चपचप असा आवाज होत होता. एका हातांत पुस्तकें, दुसऱ्या हातानें अुलटी होणारी छत्री आंवरण्याचा प्रयत्न, दातांनी वाऱ्यावर अुडणारा धरलेला पदर, अशा गडबडींत तिची छत्रीही अुलटी झाली! डोक्यावर पाअूस धो धो कोसळत होता, पुस्तकें भिजत होतीं आणि आतां तर पातळही शरीराला सोडीना. अितकी त्रेधा झाली तरी ती ट्रॅमसाठीं मागल्या स्टँडकडे चाललीच होती. तोंच हातांतलें एक पुस्तक रस्त्यावर पडलें. तें वांकून तिनें जेमतेम वर अुचललें. छत्री सरळ केली. ती आतां नखशिखान्त भिजली होती. थांबलेल्या ट्रॅममध्यें ती शिरली. तों तेथें पाय सुद्धां ठेवण्यास जागा

नाही. हिरमुसलें तोंड करून ती मागें सरली. पुरुषांनी गच्च भरलेल्या ट्रॅममध्यें ती मुलगी कशी वाट काढणार? तेव्हां ती दुसऱ्या ट्रॅमची वाट पाहूं लागली. दुसरी ट्रॅमही लवकर येण्याचें चिन्ह दिसेना. वर पाऊस धो धो पडतोच आहे आणि ती तर नखशिखान्त भिजलेली! प्रेक्षकांना काय? तीही गंमतच! ती रडकुंडीस आली तोंच कुणी तरी तिच्या अंगावर रेनकोट टाकला व डोक्यावर छत्री धरली. धाष्टर्यानें ती रागावून त्या माणसाकडे पाहूं लागली पण क्षणांत तिचा राग मावळला! त्यानें अेक शब्दही न अुच्चारतां रस्त्याच्या कडेच्या टॅक्सीला हातानें खूण केली. टॅक्सी जवळ येअून अुभी राहिल्यावर दार अुघडलें. तिला मागच्या बाजूस बसवून आपण ड्रायव्हरजवळ बसला. ' हिंदु कॉलनी, दादर! ' पत्ता मिळाल्यावर रस्त्यावरचें पाणी भर्रदिशीं अुडवीत मोटार वेगानें निघाली. त्यानें मागें वळून अेकदांही पाहिलें नाहीं. ती मात्र पाठमोरा बसलेल्या आपल्या अुपकारकर्त्याकडे आश्चर्यानें पहात होती. त्याचा रेनकोट अजून तिच्या अंगावरच होता. त्याच्या आंतल्या बाजूला तांबड्या छापील अक्षरांनी लिहिलेलें त्याचें नांव तिनें वाचलें व त्याच्याकडे पाहण्याचा प्रयत्न करूं लागली. श्मश्रूविहीन ओंठ, डोक्याला काळ्या कांबळीची टोपी, अंगांत खादीचा पण व्यवस्थित असा कोट, हातांत सोनेरी मनगटी घड्याळ, बोटांत सीलची आंगठी, धोतराचा काचा मारलेला आणि पायांत कोल्हापुरी चपला! तो बोलत नाहीं असें पाहून तिनें त्याचा रेनकोट काढून त्याच्या पाठीशीं टाकला. त्यानें मागें वळून पाहिलें. अितक्यांत मोटारच थांबली. नगररक्षकाचा हात आडवा आल्यामुळे पुढील पांच सहा गाड्यांच्या मागें हीही गाडी अुभी राहिली. त्याला तिनें डोळ्यानें खुणावून आपल्याजवळ येऊन बसण्यास सुचविलें. क्षणभर विचार करून दार अुघडून तो तिच्या जवळ बसला. ड्रायव्हर हिंदूच असून कदाचित् त्याला अिंग्लिश येत नसेल अशा कल्पनेनें ती अगदी हळू स्वरांत कुजबुजली.

मला वरळीला जायचंय. '

त्यानें होकारार्थी मान हलविली. मोटार राणीच्या बागेवरून पुढें चालली होती. थोड्याच वेळांत दादर स्टेशन आलें. शेवटीं गाडी त्याच्या दाराजवळ अुभी राहिली. तिच्या अंगावर पुन्हां रेनकोट टाकून तो खालीं अुतरला. टॅक्सीचें भाडें चुकतें केलें आणि तिच्यासह त्याने अर्ध्या अुघड्या फाटकांतून प्रवेश केला. व्हरांड्यांत अेक हास्यमुखी स्त्री अुभी होती. तिनें जरा पुढें येअून त्याच्या हातांतली छत्री घेतली आणि मागून येणाऱ्या विद्यार्थिनीला 'या! ' असें म्हणाली. बैठकीच्या खोलीतील अेका आराम खुर्चीवर त्यानें अंग टाकलें व आपल्या पत्नीकडे पाहिलें. त्या ओल्याचिब विद्यार्थिनीकडे पाहतांच तिने तिला वेषपरिवर्तनासाठी शेजारच्या खोलींत नेले. आपलें अेक जरीचें कोरडें पातळ व ब्लाअुझ तिला देअून ती परत पतीकडे आली. 'कोको करतेस? आणखी बरोबर कांहीं तरी.' त्याने कपडे काढले आणि स्वयंपाक घरांत स्टो पेटविण्याचा आवाज अैकू आला तों विद्यार्थिनी त्याच्या शय्यागृहांतून वेषपरिवर्तन करून बाहेर आली. तिच्यावर त्याची नजर खिळली होती. 'बसा' अेका, रॉकिंग चेअरकडे हात दाखवून तो म्हणाला. "आपलं मॅन अँड सुपरमॅन मजजवळच राहिलं आहे." 'वाचून झाल्यावर वाटल्यास परत करा.' या वेळी पावसानंतरचें कोवळें अून्ह पडलें होतें. घड्याळांत साडे सहाचा ठोका पडला तोंच आंतून अेका ट्रेमध्यें कोको, फळें, बिस्किटें वगैरे दोघांसाठी घेअून त्याची पत्नी आली व मधल्या छोट्याशा टेबलापर ठेवून तिनें त्याच्याकडे पाहिलें. तिघांचा अुपहार सुरू झाला. त्यानें आग्रहानें तिला फळें, सुका मेवा, बिस्किटें द्यावींत आणि तिनें नको नको म्हणत तीं घ्यावीत. त्याची पत्नी मधून मधून गालांतल्या गालांत हंसे आणि तो बरेंचसें काम न बोलतां करी.

अुपहारानंतर त्यांना लवंग, वेलदोडा देअून त्याची पत्नी शांत

गेली. त्यानें अेकदां घड्याळाकडे पाहिले व तो अुठला. कपडे घातले. 'यांना यांच्या घरीं पोंचवून येतों.'

'आपण नको यायला; मी जाअीन अेकटी.'

त्यानें छत्री घेतली. त्याबरोबर तिनेंही पुस्तकें अुचलली.

'पण पाहुण्यांचें नांव, गांव माहीत आहे ना?' त्याच्या पत्नीच्या प्रश्नाला थोडें मंद स्मित करून त्यानें नकारार्थी मान हलविली. हास्यमुखीच्या सुंदर दंतपंक्ती क्षणभर चमकल्या. विद्यार्थिनी म्हणाली;

'अन् आपलं नांव तर पुस्तकावरही नव्हतं. आतांच मी ते रेन-कोटावर वाचलं. अनोळखी माणसाला मालक शोधायला त्रासच पडायचा, नाहीं कां? अन् पुस्तक तरी परत मिळालं असतं कशावरून?' या वेळीं तो व्हरांड्यांत अुभा होता. त्याची पत्नी दारांत अुभी असून ती विद्यार्थिनीच्या खांद्यावर हात टाकून म्हणाली, 'अिकडें माणसाची पारख फार लवकर होते. नांव माहीत नसलं म्हणून काय झालं? माणूस पाहूनच पुस्तक दिलं असेल. अंगांत रसिकता अन् निरीक्षण फार आहे.'

'अन् बोलायलाही फारसं नको वाटतं?'

'असंच कांहीं नाहीं. बोलायला लागलं म्हणजे अेकतच रहावंसं वाटतं. पण बोलणं, चालणं, सगळं प्रसंग पाहून होतं.' बाहेरच्या पदपथावर तो तिची वाट पहात अुभा होता. पायऱ्या अुतरतां अुतरतां त्यानें विचारलें:

'पण तुमचं नांव सांगा ना काय तें?'

'रत्नप्रभा गोखले. यंदा अिंटरला बसणार आहें मी झेवियर-मधून. आपली ओळख झाली हें मी भाग्य समजतें.' त्या दोघांनी टॅक्सीत पाअूल ठेवलें. मोटार सुरू होतांच 'अेस. अेस. देशपांडे, अेम्. अे., बी. टी.,' ही पाटी तिनें वाचली. आणि मोटार गिरगांव बाजूस निघाली.

*　　*　　*

'ओ हो! नमस्कार वहिनीसाहेब.'

'झाली कां परीक्षा, रतन?' होकारार्थी मान हलवून रतन म्हणाली, 'आतां, कित्ती कित्ती तरी बोलायचं आहे माझ्या मनांतून? सवडच नव्हती मिळाली.'

'मग चल, येतेस कां घरी?'

'नको बाअी; चौपटीवर चल.'

ऑपेरा-हाअुसमधून सिनेमाची गर्दी ओसरत होती. 'अेकटीच आलीस कीं काय?'

थोड्या अंतरावरून रुमालानें तोंड पुशीत तोच दोघींच्या कडे येत होता आणि रतनवर त्याची दृष्टि लागली होती.

'कसे गलेत पेपर तुमचे?' त्यानें सस्मित विचारलें.

'छान! आपलं भविष्य खरं होणार!'

'हो पहायचं न् सांगायचं! पण रतन म्हणते आज चौपाटीवर बसून पुष्कळ गप्पा मारायच्या आहेत तिला. आणि आम्ही नुसते श्रोते होणार हऽ.'

'मग हँगिग गार्डनवर जाअू.' तिघेजण पायींच निघाले.

'पहा बरं हातावर; कोणता क्लास, दिसतोय कां?'

'हातापेक्षा चेहऱ्याची पारख चागली आहे मला.'

'आपण अंदाजान येणार म्हणून सांगितलेले अगदी तेच प्रश्न लॉजिकमध्यें आले. लिहिलेही चागले.' एका प्रशस्त बांकावर त्या दोघीजणी बसल्या आणि तो पत्नीशेजारी अुभा होता.

'अकारण मैत्री हेच आपलं व्यसन दिसतं. आपल्या कक्षेंत येणाऱ्या माणसांनी आपल्याला कल्पतरु म्हटलं तर त्याचं मला आश्चर्य वाटणार नाहीं. लोकाला लागेल ती मदत न मागतां करायची! मला आश्चर्य वाटतं, तें शॉचं नाटक माझ्या नांवाची नुसती चौकशीही न करतां आपण मला दिलंत. लॉजिक येत नाहीं, सांगायचं. पाअूस पडतोय, रेनकोट द्यायचा. जागा नाहीं, आपण अुभं राहायचं.

लोकावर अुपकारांचं ओझं घालून त्याच्या मोबदल्याची तुसती अिच्छाही नाही.' तो तिच्याकडे पाहून हंसला. त्याच्या पत्नीनें रतनला म्हटलें:

'लोकाला वेड लावायची कला अिकडं शिकावी. राग तर कधीं यायचा नाही कुणाचाच! परोपकाराची संधि दवडायची नाही, कारणाशिवाय तोंड अुघडायचं नाहीं. चांगली माणसं पाहिली की त्यांची अशी लहान सहान सेवा करायची.'

'माणसाची त्याच्या तोंडावर स्तुति केली म्हणजे त्याला तोंडपुजेपणा म्हणतात. 'स्तुति करावी परमेश्वराची' ही कविता हल्ली तुमच्या क्रमिक पुस्तकांतून काढलीय वाटतं?'

'म्हणूनच मला अेकेरी नांवान हांक मारावी म्हणून कितीं तरी सांगितलं. 'तुम्हांला नोट्स् काढून देअू कां? तुमचे पेपर कसे गेले? तुमचा हात चांगला आहे, तुमची पत्रिका भाग्यशाली आहे.' मला कि नाहीं वहिनी, या अहोजाहोचा फार राग येतो! माझं वय लहान. अन् तू करतेस मोठी स्तुति. फारच हट्टी स्वभाव आहे यांचा. मला नाही आवडत असलीं माणसं.'

'रतन, कुणाकडं ग बघतेस अशी निरखून?' पति-पत्नी तिच्या नजरेच्या रोखानें पाहूं लागली तों आपादमस्तक यूरोपीय पद्धतीचा पेहराव केलेला अेक अैंटबाज तरुण बागेच्या पायऱ्या चढत होता. त्याला रतन दिसली नाहीं. तोंडांत शीळ, नजर आजूबाजूच्या स्त्रिया पाहण्यांत रंगलेली.

'बरं झालं, आतां खात्री पटवून देतें प्रत्यक्षच. वहिनी, ते पहा माझे भावी पतिदेव! रिझल्ट लागल्याबरोबर विवाह व्हायचं आमचं ठरलं आहे. माझ्यावर यांनीं केलेले अगणित अुपकार, आमची जरा चमत्कारिक पद्धतीनें झालेली ओळख, नंतर वाढलेला परिचय, त्यानां मीं सांगितला तेव्हां त्यांना भलतीच शंका आली. म्हणे, 'कोणताही तरुण पुरुष विनाकारण अुपकार करणारच नाहीं.' मीं पुष्कळ खात्री

केली. तेव्हां म्हटलं आतां गाठच घालून देतें.' तिच्या भावि पतीकडे तो निरखून पहात होता. ती आतां त्याला हांक मारणार तोंच त्यानें तिला ह्मटलें :

'थांबा जरा; हांक मारू नका.' ती गोंधळली.

'तुम्हाला राग येत नसेल तर सांगतों. हा माणूस तुम्हांला दुःख देईल. याची चालण्याची ढब, बोलण्याची तऱ्हा पहा. हा माणूस अप्रामाणिक असून स्वभावाने विश्वासघातकी आहे!' रतननें एक दीर्घ निश्वास टाकला.

'मला वाटत, थोडा वेळ थांबलात तर याचा पडताळा येईल. तो कोणाची तरी वाट पहात आहे. त्याला दिसू नका. माझी कल्पना खोटा ठरली तर मला आनंदच होईल.'

रतन त्याच्याकडे कोपऱ्यांतून पहात होती, तोंच समोरून दोन तरुण विश्वयोषिता आल्या. त्याच्या हातात हात घालून ते त्रिकूट शेजारच्या कुंजांतील बाकावर बसलें. रतनचे डोळे लाल झाले. शेजारच्या कुंजात हास्याचे फवारे अुठत होते. बाटलीचीं बुचें फुटल्याचा आवाज झाला. हळूहळू अंधार पडू लागला. त्रिकूटापैकी अेक गणिका थोड्या वेळानें कुंजांतून बाहेर आली. कुंजांतील दुक्कलीवर त्यानें आपल्या टॉर्चचा अुजेड पाडला. त्या वेळी दोघांचें मुखमीलन झालें होतें. ते पाहून रतन ताडदिशीं जागेवरून अुठली.

'घरीं चला आतां. माझ्यानं पाहवत नाही हे.' रतनला घेअून ते दांपत्य घराच्या वाटेला लागले. रतन रडत होती.

'तुमचे कसे आभार मानू? मी अधःपाताच्या कड्यावर आज अुभी होतें. आपण होअून आगींत अुडी घेत होतें मी.'

त्यानें तिच्या खांद्यावर हात ठेवून म्हटले, 'अुद्यां आपण याची चर्चा करूं. आतां जरा शांत व्हा पाहूं?'

'माझ्याशीं खोटया प्रेमाचा आव आणून अिथें त्या बाजारबसवीशीं लघळपणा चालवला! म्हणे, 'पुरुषांची नजर वाअीट असते!' सभ्य-

पणाच्या पांघरुणाखालीं गळा कापायचा! मदतीच्या ओझ्यानें शीलाला पापपंकांत बुडवायचें!' त्यानें अेक टॅक्सी केली. ती वरळीकडे चालली होती.

*　　*　　*

'वहिनी, तूं मनापासून गौरीहर पुजलास, म्हणून तुला त्यांचा लाभ झाला. त्यांच्या रूपाला मोल नाही, अन् शीलाला तोल नाही. नाहीं तर मी जात होतें लांडग्याच्या कबज्यांत. यांचे कसे अुपकार मानूं? आणि मन कसें शांत करूं?'

'रतन, अिकडचा अेक गरीबसा विद्यार्थी मित्र आहे. त्याचं तुझ्यावर प्रेम आहे. अुद्यां ये; पहा त्याला. अन् आवडला तर वरभगिनीचा मान माझा!'

'त्यांचा मित्र म्हणजे शंका घ्यायला जागाच नको!'

'अंहंऽ. माझं लग्न व्हायचं नाहीं, तुमचं व्हायचं आहे. तुम्हांला पसंत पडला तर पुढें भाषा!' तो अुद्गारला.

'माझ्या पसंतीचा नमुना आतांच पाहिला ना आपण? अिंटरच्या परीक्षेचा अभ्यास आपल्या मदतीनं केला; आतां तर आयुष्याची परीक्षा पास व्हायची आहे! आपली निर्हेतुक माया आणि मौल्यवान् अुपदेश हेच माझे मार्गदर्शक! आपण देवमाणूस आहांत." ती मोटारीतून अुतरतां अुतरतां म्हणाली.

—विश्ववाणी, ऑक्टोबर १९३४

# १२

# जन्मठेप

'तुमचं लिहिणं आणि राड रस्त्यावरून मोटारचं धांवणं सारखंच ! स्वतःच्या मानी व मोठेपणाच्या धुंदीत लोकांवर अुगीच चिखलफेक करणं हा निवळ अन्याय आहे !'

'मीना !' पतिराजांनी डोळे वटारून म्हटलें.

'मी डोळयांत मावणार कां आहें ? पण खरंच सांगावं, लोकांची विनाकारण नालस्ती केल्यावांचून अेक तरी लेख लिहिला आहे कां आपण ? लघुकथेंत सुद्धां अितरांची टिंगल ! लिखाण कसं निर्मळ असावं! आपली गुणैकदृष्टिच अधू झाली आहे कीं काय ? वृथा दोष-दिग्दर्शन हे लेखकाला लांछन नाहीं कां ?'

'मीना, वर्गांतल्या विद्यार्थ्यांसमोर असलीं व्याख्यानं देत जा. माझ्यापुढ नकोत.'

'कां ? ज्यास्ती जरुरी अिथंच दिसते मला. अन् खरं पाहिलं तर वाङ्मयावर काय हक्क आहे आपला ? नसत्या गोष्टींत ढवळाढवळ करायची संवयच असते पुरुषांना !'

'कां? डॉक्टरांनीं वाङ्मयसेवा करूं नये, असा नवा नियम निघाला आहे कीं काय ?'

'अुद्या वकिलांनी दवाखाना अुघडला तर काय म्हणाल आपण ?'

''शिष्ट' म्हणेन.'

'तोच परत अहेर केला तर मग राग कां ? अन् तसंच म्हटलं तर हा अव्यापारेषु व्यापार कां ? काय आपल्याला लघु-

कथेचं तंत्र माहीत आहे, कां कांहीं काव्याचा व्यासंग तरी आहे ? कसली वाङ्मयतपश्चर्या केली आहे ?'

' तुला काय कळणार आहे त्यांत ? मांना, स्फूर्ति स्वस्थ बसू देअील तेव्हां ना ?'

' स्फूर्ति ? कां कीर्तीची अनावर लालसा ? स्फूर्तिच सांगते वाटतं, कीं आपल्या बेचव कविता गाअून--कसलं रडून दाखवा म्हणून ? स्फूर्तिच सांगते वाटतं मासिकांत लेख व कविता छापण्या-साठीं संपादकांकडे वशिले लावा म्हणून ? वग दांभिकपणा तरी किती ?'

' मनांत विचार अितकी गर्दी करतात की, ते लिहून काढल्या-शिवाय चैनच पडत नाही. '

' लिहून काढा की खुशाल ! पण ते अुष्टे विचार, शिळ्या कोट्या, ठरीव अुपमा छापायची गर्दी कशाला, मी म्हणतें. ?'

' लोकांना नकोत कां कळायला आपले विचार ? ही समाज-सेवा आहे.'

' मोठमोठीं नांवं घेतली म्हणजे झालं! स्फूर्ति, समाजसेवा, वाङ्मयसेवा! काय जगाच्या प्रगतीत वा आनंदात भर पडणार आहे अशा बाडांनीं ? अन् आपल्यासारख्या माणसांना निर्भेळ आनंदहि वाङ्मयांतून चाखतां येत नाहीं. कारण, आपण कवि, लेखक, अशी भ्रामक समजूत करून घ्यायची अन् चांगल्या अभिजात लेखकांचा हेवा करून त्यांची टिंगल अुडवून आपली पोळी पिकवायची! '

' कुचेष्टेशिवाय प्रतिष्ठा होत नाहीं हा नियमच आहे. कोण हा नियम पाळीत नाहीं ?'

' कुठला नियम हा ? आणि प्रतिष्ठेसाठीं अेवढी तळमळ कां ? तेंच आमचं पहा, ' वळवाचे पाअूस' वाचले—आनंदाचा पूर! ' पुनर्भेट ' वाचली—सुखाची लयलूट ! 'प्रतिभासाधन' वाचलं—नुसती मेजवानी !

तुमची दृष्टिच मुळी छिद्रान्वेषी. याची कुचेष्टा कर, त्याला नांवं ठेव-- '

' बस्स, मीना, तुझं पांडित्य मला अैकण्याची अिच्छा नाही. वस्तुत: तुझ्या आकांक्षा, आवडीनिवडी अभिन्न असायला पाहिजेत. मी मुखाकरितां धडपडतोय आणि तू मला शहाणपणा शिकवतेस ? माझं सुख---'

' मासिकात रद्दी लेख छापून आले किंवा फोटो प्रसिद्ध झाला म्हणजे सुख होतं हे नवीनच अैकतें मी. आपल्या वैद्यकशास्त्रांत मानवजातीच्या कल्याणाचा अेकादा शोध लावण्याचा का प्रयत्न करीत नाही ? परदुःख निवारण हेंच पुण्य. '

' भुकेल्या माणसाला अुपवासाचा अुपदेश कितपत रुचेल ?'

' अजीर्णे भोजनं विषम्.' आपला मार्गच मुळी चुकला. फाटक्या मासिकातून लोकांच्या माथी मारलेल्या लेखांनी सुख मिळतं म्हणण म्हणजे सुखाची कल्पना तरी काय आहे अिकडे ? '

' सुट्टीचा दिवसमुद्धां भांडल्याशिवाय घालवूं नकोस. लग्न म्हणजे पदवीधर, तोंडाळ स्त्रीशी गांठ असं जर मला माहीत असतं तर---'

' तर काय ? लग्नाअगोदर माझी मनधरणी कोणी केली ? तुझ्याशिवाय सगळं जग मला तुच्छ आहे वगैरे सर्व हवेंतले फवारेच वाटतं ? पुरुषांची जातच अशी बेअिमानी--- '

' मग काय ? त्या जातीवर बहिष्कार घालणार आहेस ? कां घटस्फोट मागणार आहेस ?' पतीला हेटाळणीने हंसतांना पाहून मीना चवताळली.

' हेंच कां स्त्रीदाक्षिण्य ? स्त्री म्हणजे मनासारखं बोलणारी व मनाप्रमाणं मानणारी बाहुली असं वाटतं कीं काय ?'

'आणि नवरा म्हणजे तुझ्या व्याख्यानबाजीला सदैव बळी दिलेला ठोंब्या समजतेस कीं काय? अशी तुझी कल्पना असेल तर ती चुकीची आहे.'

*          *          *          *

'ताअी, आंत ये. ओली चिंब झालीस कीं ग भिजून!' मीना मोटारींत बसली. पाअूस कोसळत होताच.

'मला वाटलं, पावसाचं चिन्ह नाहीं. म्हणून तशीच निघालें.'

'मीनाबाअी, लहरी संस्थानिक आणि वळवाचा पाअूस सारखेच. केव्हां लहर लागेल याचा नेम नाहीं. अन् हा त्या लॉरीचा प्रसाद वाटतं?'

'लॉरी? कसला, घरचाच–.'

'घरचाच? म्हणजे डॉक्टरांची गाडी होती कीं काय माझ्यापुढं? अग बाअी!'

'अन् मी दिसल्यावर तर मोटारीला जोर आला! कुंदे, आज हा सचित्र वेष घेऊन घरापर्यंत जावं लागलं असतं, तू नसती भेटलीस तर.'

'ताअी, पतीपत्नींचीं भांडणं फार दिवस टिकत नाहीत म्हणे. मग डॉक्टर हट्टी आहेत कां तू मानी आहेस? अेक वर्ष झालं,–तुमचा अबोला—!'

अुत्तराअैवजीं मीनाक्षीचे डोळे पाण्यानें भरून आले. बाहेर सोसाट्याचा वारा वहात होता आणि मीनाक्षीनें स्तब्धपणें मागच्या गादीवर डोकें टेंकलें होतें.

'रागावूं नकोस गडे अशी. प्रेमकलह रात्रीं मावळतात असं मीं वाचलं आहे कुठंसं.'

मिनाक्षीनें अेक निःश्वास सोडला. चेहऱ्यावर बळेंच हास्य आणून तिनें विचारलें:

'कुंदे, माधवरावांचा पत्ता सांग बरं मला. अन् संशयी दृष्टीनं नको बघूंस अशी माझ्याकडं.'

'कां? अिंग्लंडला जातेस कीं काय? काँग्रॅट्स्! गुड्-लक्'–

'कंटाळा आला बाअी या फिरण्याचा. बरी चांगली आपली कॉलिजांत शिकवीत होतें. पण कुठून किल्ली फिरली कोण जाणे! माझ्यामागं हें अिन्स्पेक्ट्रेसचं काम लागलं. दमलें बाअी मी सहा महिन्यांतच. कोण मेला त्रास!'

'मग? आतां डी. लिट्. होणार वाटतं? कां पीएच्. डी?'

'पत्रव्यवहार करीत होतें. अन् केंब्रिजमध्यें मला ॲडमिशनही मिळाली आहे. स्टडीलीव्हचा अर्ज बहुतेक मंजूर होअील माझा.'

मोटार थांबली.

'चल, पत्ता देतें घरांतून. आतां असं कर, चहा घे, पातळ बदल, अन् गाडीतनंच घरी जा म्हणजे झालं.'

'थँक्स्!' दोघीही गाडीतून अुतरल्या व बंगल्यांत शिरल्या. धनतोलीवरचा तो बंगला पावसांत नुसता नहात होता.

* * * *

'बक अप, डॉक्टर, आय मीन पोअेट' अ[illegible] झाला. नंतर सर्वत्र हंशा पिकला. आपल्या भसाड्या आवाजांत, [illegible] करीत कविराज आपलें काव्य वाचून दाखवीत होते. तें काव्य [illegible] पण गायनही नव्हते. काव्यगायनांत अेक मौज अशी अ[illegible]. श्रोत्यांच्या टाळ्या कवीला अभिनंदनपर वाटतात आणि प्रेक्षक व श्रोते कवीची हुर्रेवडी अुडवत असतात. अभिनंदन आणि हेटाळणी यांतला फरक कळायला आत्मनिरीक्षणाची जरुरी असते. कीर्तीसाठी हपापलेलें कवीचें अंतःकरण बाह्य देखाव्याला फसतें. काव्यगायनांत अभिजात काव्य क्वचित्च सांपडतें. गेय चाली, शृंगारिक वर्ण्यविषय, पाल्हाळाचा अभाव आणि सुरेल गळा इतक्या गोष्टींच्या आधारावर होतकरू कवि आपल्या कीर्तीची अिमारत अुभारूं पाहतात. पण

पत्त्यांचा बंगला पडायला वाऱ्याची अेक झुळूक पुरेशी होते. ही महंमदी मनोराज्यें कोसळून पडायला फारसा वेळ लागत नाहीं. कारण स्फूर्तीचा अभाव आणि व्यासंगाशी फारकत !

लंडनमधील वेस्टबोर्न टेरेसरोडवरील अेका अिमारतींत डॉक्टर महाशयांच्या कवितेचा जलसा चालला होता. मीनाक्षी हा देखावा अेका कोंपऱ्यांत बसून पहात होती. पतीचा पोरकटपणा तिला तिरस्करणीय वाटला. प्रेक्षक श्रोत्यांनी केलेली आपल्या पतीची हेटाळणीही तिला सहन होअीना. डोळ्यांचें पाणी मधून मधून पुसत कार्यक्रम संपण्याची ती वाट पहात होती. आज दोन अडीच वर्षें झालीं मीनाक्षी पतीवरचा राग जवळ जवळ विसरून गेली होती. गेल्या आठवड्यांत तो अिंग्लंडला आला असें तिला कळतांच ती फार आनंदली. पदवीधर असली तरी ती आर्य महिला होती. अपराध नसतांना सुद्धां पतीची क्षमा मागून संसाराची विस्कटलेली घडी पुन्हां बसवावयास ती तयार होती. पण——

कार्यक्रम संपतांच मिस्किल मित्रांच्या औपचारिक अभिनंदनाला भाळलेला हा कवि गर्वानें फुगून गेला. त्याला गांठीपर्यंत त्याची मोटार गेली सुद्धां. मीनाक्षीनें झटकन् अेक पत्र लिहिलें व रविवारी दुपारीं घरीं असण्याबद्दल त्याला विनविलें. त्याच्या वसतिगृहावरून जाणाऱ्या दुमजली ट्रॅममध्यें मीनाक्षी बसली. मोठ्या अुत्सुकतेनें तिनें त्याच्या फ्लॅटकडे पाहिलें आणि डोळे मिटले. अेका गौरकाय युवतीचें तो चुंबनपूर्वक स्वागत करीत होता. ट्रॅम त्याच्या फ्लॅटवरून पुढें चालली होती आणि मीनाक्षीच्या डोळ्यांपुढें निराशेचा अंधार पसरत होता. जड अंतःकरणानें मीनाक्षीनें वसतिगृहांत पाअूल टाकलें.

* * * *

'तुझीं अुपदेशपर व्याख्यानं आणि प्रेमयाचना मला सारखींच तिरस्करणीय वाटतात. गेल्या दोन वर्षांत लेखक या नात्यानं झालेले

माझे जाहीर सत्कार व काव्यगायनाचे दणदणीत कार्यक्रम अंकूनच तुझं मत बदलू लागलं वाटतं ?'

'पण चुकी झाली नसली तरी मी क्षमा मागायला तयार आहें.' मीनच्या डोळ्यांत अश्रु अुभे राहिले.

'हम्बग्. तूं क्षमा मागितलीस तरी मी केली पाहिजे ना? तुला नवरा म्हणजे कोण वाटला ? तुझ्या रागाचा सुभ जळला तरी माझ्या अपमानाचा पीळ अजून कायमच आहे.'

'मग मी काय करूं ?'

'असेच अुपदेशाचे डोज मला पाजीत रहा. हें पहा, पदवीधर बायकोच्या आहारीं जाणारा मी नाही, समजलीस ? माझ्यावर टीका ? माझं लिखाण म्हणजे राड रस्त्यावरील मोटारीचं धांवणं, नाहीं का ? मग कशाला त्या चिखलांत लोळायला आलीस पुन्हां ?'

'आपल्याला माझ्याबद्दल काहीच का वाटत नाही ?'

'नाही, आणि कां वाटावं ? तुझं नांव सुद्धां—' मीनाक्षी ताड्दिशी जागेवरून अुठली.

'हां, डोंट मेक अ सीन. त्रागा नको. गुड बाय—' दरवाजा अुघडून तो म्हणाला.

'मी जाण्याकरितां अिथें आलें नाही.' ती शांतपणें बोलली.

'मीं तुला बोलावलं नव्हतं.'

'हें घर माझं आहे. माझा आपल्यावर हक्क आहे.'

'फनी !' त्यानें आपल्या शय्यागृहाचा दरवाजा अुघडून म्हटलें, 'पहा माझ्या हृदयावर हक्क गाजविणारी राणी आंत बसली आहे. ती माझी प्रिया आणि तूं लग्नाची बायको.'

मीनाक्षीनें तिकडे दृष्टि वळविली. तों पलंगावर तीच गौरयुवती निद्रावेषांत पडली होती. मीनाक्षी दाराकडे वळली.

'गुड बाय, प्रोफेसर मीनाक्षी.' त्यानें मान हलवून हंसून म्हटलें.

मीनाक्षीचे डोळे रागानें लाल झाले होते. ती जिन्याच्या पायऱ्या अुतरत असतां डॉक्टर म्हणाले,

' अन् घटस्फोटाच्या अभावीं तुला जन्मठेपेची शिक्षा मी देत आहें.'

दारांत टॅक्सी अुभी होती. धाडकन् दार अुघडून तिनें आंतल्या गादीवर अंग टाकलें. गाडी कोठें चालली आहे याची तिला दाद नव्हती. अेका शांतशा हॉटेलजवळ गाडी थांबली. ती लिफ्ट-वरून त्याच्यामागून अेकाद्या पुतळीप्रमाणें त्याच्या फ्लॅटमध्ये गेली. त्यानें शोफरचा वेष अुतरला.

' मीना,' तिच्यापुढें आरामखुर्ची सारीत तो म्हणाला. त्याच्या हांकेनें जागें झाल्याप्रमाणें ती बघूं लागली.

' कोण ? मि० जोशी ? केव्हा आलांत अिथं?'

' मीना, वसुंधरेभोंवतीं घुटमळणाऱ्या चंद्राकडे वसुंधरेचें लक्ष्य कोठें असतें ? ती पहात असते सूर्याकडे आणि सूर्य पृथ्वीला सारखा भाजात असतो.'

मीना आराम खुर्चीवर बसली, कसली—कोसळली. वाऱ्यानें भुरभुर अुडणाऱ्या केंसांत हातांची बोटें रोंवून कावऱ्याबावऱ्या नजरेनें ती जोशांच्याकडे पहात होती. हातांनीं डोळे झांकून ती हुंदके दाबीत होती आणि शेवटीं तिचे डोळे पाण्यानें डबडबले. रस्त्यावरची धांवपळ ती शून्य दृष्टीनें पहात होती. नंतर तिनें निळ्या नभाकडे पाहिलें व हातरुमाल डोळ्यांला लावला. टेबलावर अुपहाराचे पदार्थ जोशी ठेवीत होते.

' अन् मी अिथें कशी आलें ?'

' माझ्याबरोबर.'

' नाहीं. मी टॅक्सींत बसलें होतें वाटतं.'

' होय, मी हल्ली टॅक्सीड्रायव्हर आहें.'

मीनाक्षीनें मान वर अुचलून म्हटलें,' टॅक्सी ड्रायव्हर? कुंदेचा लक्षाधीश भाअू, नागपूरच्या तीनचार गिरण्यांचा भावी मालक,

टॅक्सी ड्रायव्हर ? मि० जोशी ? एम. एस सी. झाल्यावर तुम्ही बी. ए.च्या माझ्या वर्गाला बसत होतां नाहीं ? '

' आज अडीच वर्षं झालीं. सांवलासारखा मी तुझ्यामागं हिंडतों आहें. मीना, एकाच आशेवर मी जगतोंय. तूं केव्हां तरी माझी होशील कां ?'

' पण मी त्यांची आहें. अन् हिंदु धर्माला घटस्फोट मान्य नाहीं– असं ते म्हणाले. '

जोश्यांनी एक सुस्कारा टाकला. मीना विमनस्कपणें हंसली. त्यानें पुढें ठेवलेल्या कपांतून ती चहा घेतांना म्हणाली,

' अन् तुम्ही चित्रं म्हणे फार छान काढतां ?'

त्यानें नुकतेच संपविलेलें एक चित्र तिच्या हातीं दिलें.

' कुणाचं हें चित्र ? नांव नाहीं कां या चित्राला ?'

' प्रोफेसर मिनाक्षीचं. नांवाची जपमाळ मीं घेतली आहे. मीनाक्षीनें त्या चित्राखाली कांपऱ्या हातानें लिहिलें, ' जन्मठेप. '

' गुड बाय मि० जोशी. '

' मेनी थँक्स. '

मीना निघून गेल्यावर जोशी पुटपुटले:

' जन्मठेप ! '

—मनोहर, नोव्हेंबर १९३४

# १३

# काव्यगायन

नवऱ्याची सुलतानशाही त्या गरीब गाअीच्या अंगवळणी पडली होती. पण तें गरीब बिचारें पाडस मात्र बापाचा हा धिगाणा पाहून थरथर कांपत होतें. शिव्याचा पाअूस व अपमानाच्या गारांचा मारा चुकविण्याला त्या बिचारीला दुसरा आसरा नव्हता !

‘ कां झाला अुशीर स्वैपाकाला ? कुठं गेली होतीस भटकायला?’ पतिराजांनीं गुरगुरत विचारलें आणि गडबडींत पाट मांडून घेतांना त्या बालकाच्या पायावर पाट पडला. त्या माअुलीनें निमुटपणें बालकाला मांडीवर घेतलें. तिचे डोळे पाण्यानें भरून आले. हातानें काम चालू होतें.

‘ पुरे कांगावा! समजाव अगोदर त्या आपल्या रत्नाला. माझ्या अंगाची आग झाली आहे भुकेनं, तुला रडायला काय होतंय ?’

पतिराजांच्या धूम्रपानानें अगोदरच कोंदटलेली ती खोली धुरानें भरून गेली.

‘ माझं किनी डोकं भणभणतं या विडीच्या वासानं. जरा गॅलरीत जाअून ओढावी. तोंवर वाढतेंच पान.’

‘ असेल तर भणभणेल ना? हूं, वाढ झालं असेल तें.’ गडबडीने पान वाढतांना तिचा पाय ओल्या फरशीवरून घसरला आणि ‘अग आअीग! ’ असें कळवळून ती फरशीवर पडली.

‘ मरत कां नाहींस अेकदांची ?’ असें म्हणून तो पशु बाहेरच्या खोलींत आला, कपडे घातले आणि थोड्या वेळानें दार ओढून घेअून जिना अुतरूं लागला. थोबाड विड्यानें रंगलेलें, तोंडांत विडी

आणि चिमटींत तपकीर! हा प्राणी चाळीतून खाली अुतरतांना त्याची बायको विव्हळत होती आणि मूल किंचाळत होतें. हें आमचें गृहचित्र!

आम्ही दोघेंही समोरच्या गॅलरीतून हा प्रकार पहात होतों. तिला आतां राहवेना. ती झटकन गेली आणि त्या पडलेल्या अबलेला तिनें हळूच अुठविलें. "सावकास हं? अुठा बघू? Look here, please" तिचे शब्द अैकून मी दारांत आलों.

'थोडं या बाळाला बाहेर न्यावं बरं? आपल्या डब्यांत बिस्किटं आहेत.'

थोड्या वेळाने जरा गंभीर चेहरा करून ती परत आली. खाअूच्या नादानें मूल आतां खेळू लागले होते. माझ्या पत्नीचा चेहरा संतप्त दिसत होता.

'ब्रूट! तिला चार महिने गेले आहेत. हा नवरा का पशु?' तिनें बॅगमधून दोन तीन बाटल्या काढल्या, ग्लासांत मिश्रण तयार केलें आणि ती पुन्हा त्या खोलीकडे गेली.

मुलाला थोडे खाअू घालून तिने पाळण्यात निजविलें व त्या बाअीला शातपणें पडावयास सांगितलें. विश्रांतीनंतर ती बाअी पुन्हां कामाला लागली.

'असल्या नवऱ्यांना चाबकानं झोडपलं पाहिजे.'

'अिदू, आमच्या समाजांत चाबकाचे फटकारे बायकांच्या पाठीवर ओढणारे किती तरी आहेत.'

* * *

'मार्लिन डिट्रिच'नें काम केलेला तो चित्रपट होता. Song of Songs. थिअेटरांत नुसता तोबा अुडाला होता. विश्रांतीच्या वेळीं चक्क उजेड पडला.

'स्प्लेंडिड दो ऑब्सीन!' अिदू अुद्गारली.

'ही मार्लिन, थिल्लर सुखलोलुप नटी नाही, अिदू; चांगली कुटुंबवत्सल पतिव्रता आहे.'

'त्या मे बेस्टसारखीच ना? I am no angel म्हणणारी! पुरुषांच्या नुसत्या उड्या पडतात असल्या चित्रपटावर.'

'पण तुला सुद्धां आवडला ना हा बोलपट? कलाविलासांत पृथ्वीचा स्वर्ग होतो म्हणतात.'

'पौर्णिमेच्या चंद्रापेक्षां ओढणींतला अस्फुट मुखचंद्र ज्यास्त सुंदर नसतो कां?'

मी आमच्या समोरच्या बॉक्समध्यें न्याहाळून पहात होतों. अेक जोडपें पेयावर ताव मारीत मारीत हंसण्याखिदळण्यांत मग्न होतें. मधून मधून धुराचे लोटही उसळत होते.

'कां, कुणाकडं बघणं चाललंय न्याहाळून?'

मी चष्म्याच्या कांचा पुशीत होतों तोंच अिंदू म्हणाली.

'अग बाई, तो पाहिला कां आपला शेजारी, अन् बरोबर कोण आहे ही बया? बायको कांहीं खास नाही. ती बिचारी बसली असेल घरीं तळमळत आणि नवरा अिकडे करतोय चैन!'

विश्रांति संपतांच पुन्हां अंधार पडला. अस्पष्ट उजेडांत समोरील जोडपें पडद्यावरील प्रणयाराधनाची नक्कल स्वत: करण्यांत दंग असावेंसें दिसलें.

चांदणें छान पडले होतें म्हणून आम्ही घरीं पायींच निघालों. आमच्या मागून तेंच जोडपें अेका व्हिक्टोरियांत बसून ग्रँटरोडकडे वळलें. थोडासा भपकाराही आला आम्हांला.

* * *

'आपला फार आभारी आहें मी. जर काल औषध मिळालें नसतें तर फार कठिण प्रसंग होता. मेनी थँक्स. सो कािंअड ऑफ यू!' मी नुसता औपचारिक हंसत होतों. अिंदू तो आल्याबरोबरच आत अुठून गेली.

'आपण काय डॉक्टर आहांत वाटतं?'

मी नकारार्थी मान हलवून सांगितलें कीं माझी बायको डॉक्टरीण आहे.

'अरे वा: ! अन् आपण ?'

'नाताळच्या सुट्टीत आलों आहें अिथें. मी मद्रासला बँकेचा अेजंट आहें.' माझं नांव त्याला कळू द्यायचं नव्हतं.

'आणि आपण काय करतां ?'

'मी कॉटन कंपनींत कारकून आहें अन् अेक प्रसिद्ध कवि आहे. गुणवंत नांव अैकलं असेल आपण. आज संध्याकाळींच माझं जाहीर काव्यगायन आहे. याल कां आपण ? तिकिट देअूं ?' 'बघूं' गुणवंतांनी अुधळलेले गुण आम्हांला माहीत असल्यामुळें त्यांना रजा देत ना म्हटले.

मध्याकाळी अिद्गूनें आग्रह केला म्हणूनच आम्ही काव्यगायनाला गेलों.

'मेल्याकडे पाहयलं म्हणजे वाटतं कीं येरवडयांतून पळून आलेला कैदीच जसा काहीं!'

कोणी टिंगल करीत होते, कोणी कौतुक करीत होते, पुष्कळसे गंमत बघायला आले होते.

'काय बेटयाचा आवाज तरी ?'

'अन नाटकी अविर्भाव काय आणतोय!'

'नजर बघा लेंकाची ! बायकांच्याकडे लागलेली.

'खर्डेघाशी करता करतां नाकी नव आले, अन् कविता करतोय कपाळाची.'

प्रेक्षकांकडून मिळालेले हे आहेर आम्हाला अैकूं येत होते. पण कवि मात्र आपल्याच मिजासीत गर्क होते. बरोबरच आहे.'

'ही काय कविता कां लावणी ? अन् डोळा काय मिटतोय म्हणतांना? शी ! हम्बग्.'

'चला, समजली बेटयाची अक्कल !'

काव्यगायनानंतर झालेला औपचारिक सत्कार चालू असतांनाच आम्ही घरीं परत आलों. आमच्या खोलींत सामसूम पाहून दिग्विजयी पतिराज बायकोला हळूच वजावीत होते व ती हुंकार देत होती.

‘ माझे आओ, जिवंत आहेस तोंपर्यंत ही रडकी अवकळा पुरे झाली. तूं मेलीस तर किती तरी कॉलेजांतल्या सुन्दर पोरी लग्न करायला नुसत्या अुड्या घेतील माझ्यावर. अन् हें बघ, हें समोरचं बिऱ्हाड आहे ना? त्यांच्यापाशी रडगाणं गाअू नकोस बरं का, मेहेरबानी करून ? ’

हळूहळू त्याही खोलींत अंधार पडला.

* * *

‘ तो ना बेटा, पदवीधर कवि? आहे, अगदी पूर्ण माहीत आहे मला. पदवीच्या शेंपटानं कविता करता येत्या तर गांधींच्या सत्याग्रहानं स्वराज्य नसतं कां मिळालं ?’

हळूहळू आमचा परिचय कविराजांनीच वाढविला. आज आपल्या बाडाची अेक प्रत माझ्या गळ्यांत मारण्यासाठी स्वारी आली होती.

‘ पांचवी आवृत्ति निघाली बघा माझ्या कवितांची. अगदी अभूतपूर्व खप आहे बघा माझ्या कवितेचा. आधुनिक कवींत असलं भाग्य कुणाच्याहि वांटयाला आलं नाहीं. दोन ठेवूं कां प्रती ? अेक भेट द्यावी आवडत्या माणसाला ? ’

‘ लावण्यांचे जलसे रोज रोज नाहींत कां होत?’ असें अुत्तर देण्याचें माझ्या तोंडांत आलें होतें अगदीं. पण म्हटलें जाअूं द्या. पाहूं तर खरी आणखी काय अक्कल पाघळतात ती.

‘ अन् तुम्हांला मौज सांगूं कां ? माझे सगळे समकालीन कवि माझा हेवा करतात, अेवढं माझं नांव झालं म्हणून. अशी पण अेकेकाची हजरी घेतलीय म्हणतां ! ’

' पण तुमच्या कवितेंत आत्मश्लाघाही फार दिसते हो. मानी व मोठेपणाची खोटी भावना शिष्ट-संमत नसते. आत्मस्तुति व परनिंदा तर त्याज्य असं तुम्हांला नाहीं वाटत ? '

' पण शठं प्रति शाठ्यं हें तर माझं तत्त्व आहे. मी आपला नात्यांचा चाहता आहे. पुन्हां हीं क्षुद्र घुगुरटीं त्रास देत नाहींत. तुम्ही म्हणतां तो पदवीधर कवि, तोंड सुद्धा अुघडत नाही बेट्याचं. कधीं संमेलनाला हजर राहील तर शपथ, पण फार मानी लेकाचा. पण असा त्याचा दिला धुव्वा उडवून! अहो प्रत्येक संपादकाजवळ माझा वशिला आहेच. दिली अेकदां टीकेची सरबत्ती अुडवून. आतां अगदी त्याचे थंडे ताबूत. '

कवीची पाठवणी म्हणून अिंदूने अेक कप चहा आणून ठेवला.

' अन् मी मद्रासला येणार आहें मे महिन्यांत. हल्ली मी काव्य-गायनाचे दौरे काढतो. आपली मदत होअीलच. हो बिदागीशिवाय कार्यक्रम नाही असं मी चक्क बजावलं व्हिल्यापार्ल्याला. बर, येतो. नमस्कार. अुद्या जाणारच तर आपण? म्हटलं चहाला माझ्या घरी याल.'

' थँक्स. आता रजा सपत आली. '

' हो. चागला बजावा त्या किंचित् कवीला माझा कसा अुदोअुदो चाललाय तो. त्याची गांठ पडत नाही हो कुठं संमेलनांत अशी अेकदां त्याची खेटरानं पूजा–'

' शट अप् ' आंतून अिंदू ओरडली.

कवि कावरा बावरा होअून जागेवरून अुठला.

अिंदू दारांत येअून कडाडली,

' कवि आणि माणुसकी यांची फारकत असते की काय ? अेका बायकोला वागवितां येईना त्यांनीं जगाला शिकवायचा आव कशाला आणावा ? जा. त्या गाअीला अगोदर औषध पाणी द्या. अन् कायरे

अे माकडा, कुणाची खेटरानं पूजा बांधतोस पहा डोळे उघडून. ज्यांच्यावर तूं मनसोक्त टीका केलीस ते कवि तुझ्या समोर शांतपणें बसले आहेत. तूं गरूड ? गरुड कसला, गिधाड तूं !' कवि बिचारा भीतीनें कांपत कांपत उठला.

'अहो, हे त्या दोन प्रतींचे पैसे घ्या?' कवीनें पुन्हां कांहीं मागे पाहिलें नाहीं. अिंदूनें ती दोन पुस्तकें समोरच्या गॅलरींत भिरकावून दिलीं.

* * *

अितका संथपणा पण कसा अंगांत, मी म्हणतें ? तो आपला टीका करतोय अन् आपण त्याला प्रोत्साहन द्यायचं ?'

'अिंदू, त्याची सुखाची कल्पना म्हणजे कवितेवर मिळविलेलं नांव. पण चंचल जगाची लहर त्याला कशी कळावी? अग, कोल्हा काकडीला राजी. कीर्ति म्हणजे समाजाच्या तोंडची पोकळ वाफ! काळाच्या अुन्हानं ती वितळून जाण्याला वेळ लागत नाही. त्यानं नुसती स्वर्गाची वर्णनं करावींत. मी स्वर्गसुखांत विहरत आहे.'

'कुठला आपला स्वर्ग ? '

'हा नव्हे कां मजजवळ ?'

अिंदूनें बाजूला तोंड फिरविलें आणि मद्रास मेलनें स्टेशन सोडलें.

(अप्रकाशित)



# १४

# मुलींची शाळा

‘ अन् सर, गोखल्यांच्या घरांत काय सगळीं मोडकींच घड्याळं होती काय हो ? कां त्यांच्या वेळेला पुण्यांतले सगळे हौद गळके होते ?’

‘ कां बरं शांता ?’ मास्तरांनी विचारलें.

‘ कां म्हणजे ? सगळी आपलीं अुदाहरणं त्या मोडक्या घड्याळांचीं आणि फुटक्या हौदांचीं! अन् ते गोखले म्हणे मोठ्ठे समाजसुधारक होते! पण कामावर आपल्या बायका अन् मुलं लावलीत. हेंच कां स्त्रीदाक्षिण्य ? अहाहारे !’ अगोदर मास्तरांना हंसायला कारणच लागत नसे, अन् त्यांत शांता आपटेचे प्रश्न ! अुत्तर देण्याअैवजी मास्तर आपले हंसतच सुटले. हास्य हा अेक संसर्गजन्य रोगच आहे म्हणाना ?

‘ हंसण्यान कांही प्रश्नाचं अुत्तर मिळत नाहीं, सर. काय तीं काळकामवेगांतलीं अुदाहरणं ! माझ्यापुढं अगदी काळच अुभा राहिल्यासारखा वाटतो. ’

‘ अन् त्या कारिका काय कमी आहेत ?’ कुसुम घाटेने तिची री ओढली.

‘ जळलं मेलं तें शक्लृ पच् मुच् रिच् वच् विच्....’

‘ नाअी, शिव्या आहेत कां काय ग या ?’

‘ अग, शिव्याच नाहीं तर काय? पण आपल्या संस्कृत शिव्या!’

‘ तोंतरं व्हायचं माणूस अेकादे वेळीं !’

'कशाला हें गणित अन् संस्कृत ठेवलंय परीक्षेला, कुणाला ठाऊक ? जीव घामाघूम होतो पाठ करतांना !'

'द्राड नवऱ्याच्या नांवाप्रमाणंच या कारिका कांही तोंडांत वसत नाहींत बाओी.'

पलीकडे बसलेल्या शिक्षकिणीत हंशा तर पिकलाच, पण अितका वेळ हंसणारे मास्तर मात्र अेकदम गंभीर झाले. हेडमास्तरीण प्रमिलाबाओी तर चमकल्याच.

परीक्षा होअून रिझल्ट लागायला थोडा अवकाश होता म्हणून या निळ्या पक्षांना (Blue Birds) घेअून काळे मास्तर वनविहारासाठी आले होते. अकरा वाजायला आले होते. वळेंच तोंडावर पुन्हां हंसें आणून मास्तर म्हणाले:

'आतां पोहायचा कार्यक्रम हं ?'

मुली स्नानाच्या तयारीनें अुठल्या. 'हें पहा! अिथ पाणी अगदी बेताचं आहे. त्या खडकाच्या पुढें मात्र जाअू नका म्हणजे झालं.' काळे मास्तर अुठतां अुठतां म्हणाले.

'पण, सर, आम्ही बुडायला लागलों तर ?' शांतेनें विचारलें.

'तुम्ही नका बाओी जाऊं. सर, बाओींना तर स्वतःपोहायची मारामार, मग त्या आम्हांला काय शिकवणार कपाळ ?' कुसुम म्हणाली.

'मग असं करा, मी नदीकडे पाठच फिरवून बसतों! जरूर लागली तर मी आहेंच. तुमचं पोहणं झालं म्हणजे मी जाओीन त्या वळणाकडे म्हणजे मग या सर्व जणी पोहतील.' शिक्षकिणींनीं मंदस्मित केलें. मुलींचें पोहणें झाल्यावर मास्तर जाअू लागले. प्रमिला मास्तरांकडे पहात होती. 'लवकर या हं सर, आतां अगदीं रान कडकडलंय. केव्हां हातातोंडाची गांठ पडेल असं झालंय.' कुसुम म्हणाली.

'बरं.' मास्तरांनीं जातां जातां अुत्तर दिलें. 'हें पहा, तुम्ही अेक लॉंग व्हिसल द्या, कीं पांच मिनिटांत मी येओीन.'

मास्तर गेल्यावर बाओींनी स्नानें आंवरलीं; फक्त प्रमिलाबाओी पोहत होत्या. बराच वेळ लॉंग व्हिसल झाली तेव्हां त्याहि बाहेर आल्या. मास्तर येण्याच्या आंत त्यांचें वस्त्रपरिवर्तन झालें होते.

'सर....' शांता बोलतांना थांबली.

'काय शांते ?'

'त्या मायामच्छिद्रांत तो शंखनाद–'

'तसा मी दिसतोय की काय तुला अिथं ? भले शाबास !'

'किती पण छान फिल्म आहे ती !'

'अन् कशी शंखनादाची फजिती होते नाही, कुसुम ?

लीला पहिलीतली मुलगी होती, तिने चटकन् विचारलें :

'सर, पण तुमचं लग्न नाही झालं का अजून त्या मच्छिद्रासारखं ?'

स्वतःचा गोरामोरा झालेला चेहरा जरा बदलण्याचा प्रयत्न करीत मास्तर हंसून म्हणाले, 'झालंय की माझं लग्न–'

'अन् बायको कुठंय ? अेकटेच राहतां तुम्ही ?'

'तिन टाकलं मला, लीले !' !

सगळ्या मुली व मास्तरणी हंसत होत्या.

'ते कसं ?' अजाण लीलेने विचारलें.

'ती कीलोतला कशी पुरुषांना ठार करीत होती ? तसं. '

मास्तर वरून हंसत होते पण त्यांचे डोळे पाण्यानें भरून आले होते.

'काय धूळ अुडते अिथं?' असें म्हणून त्यांनीं गॉगल्स चढविले. प्रमिला आकाशाकडे पाहात होती.

* * *

छोट्या कुसुमचे डोळे पुसतांना प्रमिलेचे डोळे मात्र पाण्यानें डबडबले होते.

'अन् किनी बाओी, आज सात दिवस झाले काळे मास्तर बोलतच नाहींत. तीन दिवस झाले फक्त पाणी पितात. मुळींच जेवले नाहींत !'

'घरांत आहेत कां ? '

'अं ऽ हं ऽ जे अेकदां सकाळीं जातात ते रात्रीं परत येतात. अन् मग मीहि दुपारीं जेवलें नाहीं अन् आओीनं सुद्धां सांगितल. पण—'

'कुठें जातात ?'

'सांगू ? संगमाच्या घाटावर काल रात्रीं किनी मी जाळींतनं पाहचलं तर काळे मास्तर त्या तसबिरीसमोर बसून रडत होते. काय हो झालं असेल त्यांना बाओी ?'

'बरं कुसुम, तू आतां जा, जेव जा अं ?'

'तुम्ही याल त्यांना घेअून ?'

मानेनें होकार दर्शवून प्रमिला निघून गेली.

मे महिन्याची सुट्टी संपायला आतां चारच दिवस अुरले होते. पण काळे मास्तर कुठें गेले नाहींत अन् आले नाहीत. शाळेंत काम नसल्यामुळें ते प्रमिलेच्याहि दृष्टीस पडले नाहीत.

झपझप पावलें टाकीत प्रमिला संगमावर चालली होती. घाटावरील पायरीची अुशी करून मास्तर झोंपले होते. मावळत्या सूर्याची कोंवळी किरणें त्यांच्या तोंडावर पडलीं होतीं. झोंप कसली ? ग्लानीच ती ? जवळ खडूनें काढलेलें अेका स्त्रीचें चित्र फरशीवर दिसत होतें. प्रमिला किती तरी वेळ त्या क्लांत मुद्रेकडे पाहात अुभी होती. तिच्या हातांतील छत्री फरशीवर पडली. मास्तर जागे झाले. डोळे अुघडून पाहतांच प्रमिला दिसली. क्षणभर मुखावर स्मित रेषा अुमटली. कांहीं अेक न बोलतां ते नदीवर गेले. हातपाय धुअून संध्या करूं लागले. प्रमिला शांत मुद्रेनें अुभी होती. शेवटी बराच वेळ झाल्यावर 'जय जय करुणाब्धे! श्रीमहादेव शंभो!' ही मानस पूजेची शेंवटची ओळ गुणगुणत स्वारी परत आली. कपडे घातले. संगमेश्वराला नमस्कार करून मास्तर घाटाकडे जावयास निघाले. मागें पाहिलें सुद्धां नाहीं.

आपली विचारपूस तर राहोच पण नुसतें आपल्याकडे पाहिलेंहि नाहीं या अपमानानें प्रमिला चिडली. 'अविनयमपनय विष्णो!'

वगैरे गुणगुणत मास्तर रस्त्याला लागले. चेहऱ्यावर क्रोध व डोळ्यांत अश्रू ! प्रमिला जड पावलांनीं घरीं गेली.

दुसऱ्या दिवशीं पोस्टानें प्रमिलेला एक पत्र आलें. प्रमिलेनें अक्षर ओळखलें. अधीरपणें तिनें पाकीट फोडलें. आंत चार ओळी होत्या.

"सा. न. वि. वि.

माझे मौन सकाळीं संपलें. काल व्यर्थ आपल्याला तसदी पडली. क्षमा असावी. कांही काम असल्यास कळवावें.

विनीत—**काळे**."

'प्रमिला काळे, बी. ए., बी. टी.', हा पत्ता जरा कांपऱ्या हातानें लिहिला होता.

' संध्याकाळी ऑफिसांत भेटावें. ' अशी नोट पाठवून प्रमिला आरशांत पाहत अुभी होती.

* * *

' जेवण झालं कां ? ' तिनें विचारलें.

मास्तर अुत्तर न देतां अुभे होते. तिनें त्यांच्याकडे अेक खुर्ची सारली. पाय आपटीतच ती अुठली. शिपायाला कामावर पाठवून दिलें. फाटकाला आंतून कडी लावली व ऑफिसचें दार ओढून घेतलें. तिच्या अंगाला दरदरून घाम सुटला होता अन् मुखावर अुल्हास पण दाटला होता.

' जेवण झालं कां ? '

प्रश्नाला अुत्तर देण्याअैवजी मास्तर प्रमिलेकडे शांत मुद्रेनें पाहात होते. कपाळावरचा घाम टिपून रडक्या आवाजांत प्रमिलेनें विचारलें; ' झालं का जेवण आज ? '

' पाकशाळेंतला प्रश्न विद्यालयांत शोभत नाही. ' मास्तरांनीं तुसडेपणानें अुत्तर दिलें.

' अुत्तराची टाळाटाळ तरी शोभते वाटतं ? ' प्रमिलेचा आवाज खणखणीत होता.

' शाळेचं कांहीं काम नसेल तर—'

' तर नाहीं न् कांहीं नाही. माझा हुकूम आहे. प्रश्नाचें अुत्तर कांहीं अवघड नाहीं. '

' वरिष्ठांचा हुकूम मी कधींही मोडलेला नाही. '

' बरं, खालीं बसायला कांहीं हरकत आहे कां ?' तिनें कपाटांतून फळें काढून टेबलावर ठेवलीं. मोसंब्याचा रस ती काढू लागली. पेल्यांत रम घालून पेला पुढें केला. मास्तर जागेवरून हलले नाहींत कीं बोलले नाहींत.

' स्वभाव तरी हटवादी थोडा आहे कां ? ' मास्तरांनी दाराकडे पाहिलें. त्यांनी दार गांठण्याच्या आंत प्रमिलेनें त्यांच्या पायाला मिठी घातली. तिचे डोळे पाण्यानें भरले होते. ती थरथर कांपत होती.

' सगळा अपराध माझ्याकडे आहे. मी चुकलें. आतां छळवाद पुरे नाहीं कां झाला ? आज सहा महिने झाले आपल्याला अिथें येअून. अितकी मी पुढं पुढं करतें पण अजून कांहीं पाझर फुटत नाहीं. झालं की नाही आज जेवण ? मुळींच सोडणार नाहीं पाय. अितरांशी अितक्या गप्पा मारायच्या, त्यांना हंसवायचं पोट धरधरून अन् माझ्यावरच कां अेवढा राग ? '

' सोड, पाय सोड. '

' नाहीं सोडीत जा ! मी चुकलें म्हटलं ना ! '

' झाली तेवढी शिक्षा पुरे झाली मला. '

' शिक्षा ? '

' स्वतःच्या शहाणपणाच्या घमेंडीवर नवऱ्याचा त्याग कुणीं केला ? सासर सोडून कोण पुण्याला कॉलेजांत गेलं ? 'पैसे न मिळ-विणारा अैदी पति ' म्हणून माझी कुचेष्टा कोणीं केली ? अितरांनी वाटेल तसं बोलावं, माझ्या चित्रकलेची थट्टा करावी. पण तूं—तूं—माझी बायको, मला टाकून गेलीस ! आज पांच वर्षं झालीं, मी मेलों कीं जिवंत याची तूं चौकशी तरी केलीस कां ? तूं हेडमास्तरीण

झालीस. तुला काय पैशाला कमी ? आणि मी, एक वेडा चितारी, अंतखाऊ, खरं ना ? '

' पण आतां मी चुकलें म्हटलं ना ? आतां आगोदर तीं फळं अन् तो रस घ्यावा. पुढं बोलायला आहे पुष्कळ वेळ. मला आतां अगदीं पूर्ण पश्चात्ताप झाला आहे. स्त्रियांचं जिणं पुरुषांवाचून व्यर्थ आहे याचा पुरता अगदीं पुरता अनुभव आला. मी आतां सोडायची नाही प्राण गेला तरी. ' बराच वेळ मास्तर स्फुदस्फुंदून रडणाऱ्या प्रमिलेकडे पाहात होते. शेवटी मास्तरांचे डोळ्यांला पाणी आलें. ते अस्फुट स्वरांत बोलले:

' प्रमा, प्रमा— '

' माळ का घ्यायची माझ्या नावाची ? '

' मुलींच्या शाळेंत आलों अन् माझी प्रमिला पुन्हां मिळविली. कशी काढली असतील पांच वर्षं, माझीं मला ठाऊक. '

' अन् मला काय ठाऊक नाहीं ? नुसता माझा मॅट्रिकचा रिझल्ट पाहायला गेलें नी यायला थोडा अुशीर झाला तर येवढाले डोळे केले होते ! '

' प्रमा, पांच वर्षात तू बी.टी. झालीस, नोकरी पटकावलीस आणि मला अिंटरपासून बी. अे. व्हायला चार वर्षं लागलीं ? '

' पण मला कुठं चित्रं काढतां येतात अिकडल्या सारखी ? खरं सांगू का, मला किनी, थोरल्या बाअींचं बोलणं सहन होअीना. त्यांनी किती पण मानखंडना करायची आपली ? अन् मी शिकलेली म्हणून माझी कुचेष्टा ! अगदी वैतागून माहेरीं गेलें मी. सुखासुखी कां गेलें ? विरहाचं औषध सुखासुखी कोण घेअील ? '

' पण पोस्टांत काय संप झाला होता या पांच वर्षांत ? '

' ज्या दिवशीं आपला नोकरीचा अर्ज आला त्याच दिवशीं मी पत्र लिहिणार होतें. पण म्हटलं बरं झालं. चांगलं वांकवीन आतां हाताखालीं

'असं का ? म्हणूनच लवथवती चालली होती वाटतं ?'

'पण सगळ्या शाळेचा ओढा आपल्याकडे. ! कुणाला हंसवायचं, तर कुणाची कुटाळी करायची. पण मला मात्र रडवलं ना ? मी नाहीं बोलत जा !'

मास्तर खुर्चीवर बसले होते आणि त्यांच्या केसांवरून प्रमिला हात फिरवीत गुणगुणत होती.

'प्रेम लाभे प्रेमळाला, त्याग ही त्याची कसोटी ।'

'बाअी--' हलकेंच दार अुघडून आलेली कुसुम मुलीच्या शाळेंत हें पुनर्मीलन पाहून मध्येंच थांबली.

(विहंगम, नोव्हेंबर १९३४)

---

# १५

# हस्तसामुद्रिक

" हा माणसांचा कोंडवाडा. स्वतःच या कैदखान्यांत कोंडून घेऊन माणसांनीं गुराढोरांवर ताण केली आहे. गुरांना नेऊन कोंडावें तरी लागते."

" काय आहे आंत ? " तिनें हळूच प्रश्न केला.

" आपल्या थापेबाजीनें लोकांच्यापासून वाटेल तितके पैसे अुकळणारा अेक पाद्री."

" लोक काय वेडे आहेत अुगाच पैसे द्यायला ? "

" भविष्यवाद्याचा आव आणणारा अेक थापाड्या. "

" चल जाअूं आंत. " ती बुरखेवाली सोत्कंठ म्हणाली.

" पैसे घालवायचे असले तर चला. पण आंत माझा तर गुदमरून प्राण जाअील. "

"खरंच, गर्दी तर कमालीची आहे."

" थांबा, मी वाट आहे कां पाहून येतों. "

" बरं." ती जत्रेतल्या मौजा पाहात अुभी राहिली. गोमांतकाच्या सृष्टिसौंदर्याच्या जोडीला गोमांतकीय ललनांचा मीनाबाजार त्या जत्रेंत भरला होता. किरिस्तावाच्या 'आफ्रिकेच्या हुंड्या' पाश्चात्य वेषांत सजलेल्या होत्या, तर मंगेश मार्डोलच्या वारयोषिता हिंदी वेषांत नटल्या होत्या. क्वचित् आंग्लयुवतीहि तेथें मोठ्या झोकांत वावरतांना दिसत. फक्त कटिवस्त्र असलेले गावडे बुटासुटांत चाललेल्या धर्मभ्रष्टाला धक्का देत चालले होते; तर आपादमस्तक काळा झगा घातलेला पाद्री, डोक्यावर शेंडी, कपाळाला गंध लावून

चाललेल्या भटाबरोबर गर्दीतून वाट काढीत होता. आपल्या नोकराची वाट पाहणारी ती ओढणी घेतलेली प्रौढा पुरुषांपेक्षां स्त्रियांकडेच निरखून पाहात होती. जणूं कांहीं ती त्या सुंदर स्त्रियांचा हेवाच करीत होती.

"जायला वाट आहे, पण मला तर ती बाओी लफंगी दिसते." आपल्या नोकराकडे आश्चर्यपूर्ण दृष्टीनें पाहून ती म्हणाली.

"बाओी? तो पाद्री आहे ना?"

"नाहीं, ती हबशी बाओी, आणि इंग्रजी छान बोलते." तिचा होकार मिळतांच गर्दीतून वाट काढीत काढीत तिघेजण तंबूवजा जागेंत आले. अंत नुसती तुफान गर्दी होती. अेका बाजूला दोघे जण आपली पाळी येण्याची वाट पाहूं लागले. कोणाला मूल केव्हां होओील, कोणाला नोकरी केव्हां लागेल, गुप्तधन केव्हां लाभेल, हरवलेला मुलगा कधी परत येओील, बढती केव्हां मिळेल, नवरा कसा मिळेल, बायको सुंदर मिळेल कां कुरूप, असलींच प्रश्नोत्तरें तेथें सारखी झडत होतीं. कोणत्याहि प्रश्नाचा पिंगा कामिनीकांचनाभोंवतीच होता. भविष्य कथन करणारी जिप्सी स्त्री वृद्ध दिसत होती. तिचे डोकें अेका रंगीबेरंगी रेशमी हातरुमालानें बांधलें होते. अंगांत अेक मळकट रेशमी कफांचा शर्ट, त्याखाली जुनासा स्कर्ट, पायांत बूट, डोळ्यांना चष्मा, तिच्या समोर रुपयांचा ढीग पडला होता. अेका कौंटरच्या मागें ती अुभी होती व ती चेहऱ्याशिवायच नुसते हात पाहून भविष्य सांगत असे. अेक गिऱ्हाओीक संपलें कीं दोनतीन मिनिटें ती विसांवा घेओी. पुनः दुसऱ्या नव्या गिऱ्हाअिकाच्या भविष्याला प्रारंभ होओी. नोकरानें आपल्या मालकिणीची वर्णी लावून दिली. बराच वेळ तिचा हात पाहून शेवटीं त्या भविष्यवादिनीनें अिंग्रजींत अेका चिटोऱ्यावर लिहिलें:

"हा हात स्त्रीचा नव्हे." तें चिटोरें चोळामोळा करून फाडून टाकतांना ती स्त्री जरा दचकली.

"लाअिफ रीडिंग ?" तिनें कांपत कांपत प्रश्न केला.

"हंड्रेड रुपीज. स्पेशल टाअिम." अुत्तर आलें.

"अुद्यां ?" प्रौढेनें आपला बुरखा ओढून विचारलें.

"अुद्यां दुपारी" तिनें कागदावर वेळ टिपून घेतली.

नोकरासह ती प्रौढा वाट काढीत काढीत बाहेर आली. समुद्र-किनाऱ्याच्या वाटेनें दोघे जण आपल्या हॉटेलकडे वळले.

"काय सांगितलं बाअीने." नोकरानें विचारलें.

"कांही विशेष नाही. बर मी परवां सकाळी जाणार येथून. फोंड्यावरून मार्दोळ मंगेशीचें दर्शन घेअून गोकर्णाला जाणार. तेव्हां माझं काम केव्हां करणार ?"

"आज रात्री आणूं तिला ? "

"माझ्यामागं माझं नाव चालवायला मला अेक मुलगी दत्तक घ्यायची आहे. साधारण सतराअठराच्या सुमाराची, हुषार आणि दिसायला सुंदर असावी."

"अगदी तशीच आहे, आज रात्री आणीन."

"कुणाची आहे मुलगी ही ? "

"अेक अनाथ पण फार खुपसूरत मुलगी आहे."

"लग्न झालं असलं तर—"

"छे, छे, कोण करणार तिचं लग्न ? "

"तुझी मेहनत फुकट जाणार नाही."

"वा, आणखी काय पाहिजे मला ? "

नोव्हा गोव्याच्या अेका छोटयाशा पथिकाश्रमांत ही बाअी अुतरली होती. तिचा नोकर गोव्याचाच राहणारा असून तो पथिकाश्रमांत काम करीत असे. आपल्या खोलीतल्या खिडकींत अुभी राहून, अुच्च वर्णाच्या हिंदु स्त्रीचा पोषाख केलेली ती अवगुंठनवती स्त्री मंत्रेंतून घरीं परतणाऱ्या स्त्रीपुरुषांकडे पाहात अुभी होती. नोकर खालीं कामाला निघून गेला.

—२—

" नांव काय तुझं ? "

" कुंदा. " अुत्तर देतांना कुंदकळ्यासारखे तिचे दांत चकाकले.

" अुद्योग काय करतेस ? " तिच्या खांद्यांवर हात ठेवून तिने विचारलें.

" मंगेशीच्या देवापुढं गातें. " ती गोड आवाजांत म्हणाली.

" मजजवळ राहशील ?" तिच्याकडे टक लावून ती पाहात होती.

" होय. "

" तुझं लग्न झालं आहे काय ?"

अुत्तर देण्याअैवजी तिनें अेक दीर्घ निश्वास सोडला.

" नाही. मला या जिण्याचा अगदी कंटाळा आला आहे. "

" कां बरं ?" तिच्या अुत्तरानें आश्चर्यचकित होअून ती बोलली.

" देवदासीचं जिणं कुत्र्यावाणी असतं. पैसा देअील त्याच्याजवळ प्रेमाची बतावणी करण्यापेक्षां-- " तिनें अेक हुंदका दिला

" माझ्याबरोबर विश्वासान वागशील ना ? मी तुला काही कमी पडूं देणार नाही. अगदी जिवाभावानं जपेन. '

" मला या नरकपुरीतूनं सुटायची अिच्छा आहे. "

" तुला संसाराची हौस नाही कां ?"

' आहे पुष्कळ. पण– आम्हांला निर्जीव खेळणी बनवून आमच्या मतांची यत्किंचित् दिक्कतही न बाळगणाऱ्या रंगेल लोकांपेक्षां आमच्याशीं अिमानानें वागणारा अेकादा पुरुष जर लाभला तर--' तिला पुढें बोलवेना.

ती बुरखेवाली कुंदेच्या केंसांवरून आपले रांकट हात फिरवीत होती. कुंदेच्या मनांत क्षणमात्र जरा संशय आला. " आपण कुठें रहायचं ? "

जरासा विचार करून तिनें अुत्तर दिले, " परळी वैजनाथ हें

मोठं शिवाचं स्थान आहे. तिथं राहूं. अुद्यां तूं आपलं सर्व सामान बांधून ठेव. अुद्यां रात्रीं येथून निघायचं."

आनंदलेली कुंदा बरं म्हणून जाअूं लागली.

"हें बघ मी तुला दत्तक घेणार आहें आणि माझ्या संपत्तीची मालकीणही पण करीन. जन्मभर खाअून संपणार नाहीं अितका पैसा मजजवळ आहे. मी सांगेन त्या पुरुषाशी लग्न करशील?"

"लग्नाच्या बाबतींत बायकांना कोण विचारतो? जिवांत जीव असेपर्यंत मी बेमान होणार नाही."

"शाबास. बांधाबांध करून ठेव अं—? उद्यां संध्याकाळी सामान घेऊन इकडे ये." पथिकाश्रमाच्या उच पायऱ्या अुतरून कुंदा परत चालली होती. ती प्रौढा तिच्याकडे आशाळभूतपणें पाहात होती.

नोकर आल्यावर त्याला चिरिमिरी देअून तिनें त्याला खूष केले. ज्योतिष्याकडे ती दुसरे दिवशीं अेकटीच गेली. तिचा भूतकाळचा अितिहास तर तंतोतंत खरा ठरला. भविष्यकाळी तिला अेका जिव्हाळ्याच्या माणसाची प्राप्ति होणार. पण—" ती भविष्यवादिनी जरा थांबली. थोडा वेळ गंभीर चेहरा करून तिच्या हाताचें निरीक्षण ती करीत होती.

"बंदिवासाच संकट तुमच्या हातावर आहे."

"केव्हां?"

"हाताचा छाप घेतल्याशिवाय नक्की सांगता येणार नाहीं." ती प्रौढा घाबरली. "हाताचा छाप अंगठाहि अुठवून द्यायचा! नको. मात्र नक्की वेळ अदाजाने सागा." "पुढल्या वर्षी." भविष्यवादिना शातपणें म्हणाली. प्रौढेच्या अंगावर काटा अुभा राहिला.

"याला अुपाय काय?"

"आहे. स्थानत्याग करावा." प्रौढा त्या भविष्यवादिनीकडे निरखून पाहात होती.

" हाताचा छाप दिला तर नक्की वेळ सांगून छापहि परत देईन." प्रौढेचा चेहरा खुलला.

" बरं तर. छाप घ्या आणि वेळ नक्की सांगा."

तावडतोब भविष्यवादिनीनें तिच्या हाताचा व आंगठ्याचा ठसा घेतला आणि एक वर्षाच्या आंतच बंदिवास आहे असें निश्चयपूर्वक सांगितलें. " तुम्ही गोमांतक सोडा व अेखाद्या तीर्थक्षेत्री जाअून रहा." शंभर रुपये तिनें मांजून घेतले. जरा धडधडणाऱ्या मनानें ती प्रौढा पथिकाश्रमाकडे वळली. कुंदेसह रात्री बारा वाजतां हळूच गुपचूपपणें तिनें एका स्पेशल मोटारींतून प्रयाण केलें. पथिकाश्रमाच्या नोकराला तिनें मोठ्या पहांटेस अुठविण्यास बजावले होते. तोहि निर्धास्त आपल्या खोलीत झोंपला होता. तीन वेळ निरोप पाठवूनहि हाताचा छाप परत मिळाला नाही.

तिरुपतीच्या स्टेशनवर संध्याकाळच्या गाडीनें अेक प्रौढ स्त्री व मोहक तरणा बांड पुरुष अुतरले व गिरीकडे जाणाऱ्या मोटारींत बसले. रात्रभर तिरुपति गांवांत मुक्काम करून मोठ्या पहाटेस डोलींतून जाण्याअेवजी त्यांनीं चार रुपये जास्त देअून रात्रीच गिरीचा डोंगर चढण्यास प्रारंभ केला. गिरीच्या डोंगरावर रात्रंदिवस यात्रेकरूंची जा ये असते. वाटेनें विद्युद्दीपाची सोय होती. चांदण्या रात्रीं गिरीवरील सृष्टिसौंदर्य अस्पष्ट प्रतीत होत होतें. रांकट मद्रासी भोई मध्यान्ह रात्रीच्या सुमारास गिरीवर पोंचले. " गोविंदा, गोविंदा, गोऽऽविंदा" चा जयजयकार, गोपुरांचीं शिखरें आणि वरचें अत्यंत भव्य देवालय, त्याचा तो जगड्व्याळ रथ वगैरे पाहून त्या प्रौढ स्त्रीला आनंद झाला. येथें येणाऱ्या यात्रेकरूंत दक्षिणचे कानडीच फार. त्यांची भाषा कळण्याची मारामार. त्यांच्या काळ्या कुट्ट वर्णाकडे तर पाहून ओकारी येअी. गिरीवर यात्रेकरूंची राहण्याची सोय फार चांगली आहे. भाड्यानें घरें मिळतात. अितर सर्व सोया येथें आहेत. अेका बाजूला अेक घर भाड्यानें घेअून ते दोघे जण राहिले. लौकरच

त्यांचा तेथें विवाह झाला. रोज दिवसां निसर्गसौंदर्यानें भरलेल्या गिरीवर सहल करावे. नोबतीला कुंदेसारखी सखी. जवळ पैसा मुबलक. वस्ती गिरीसारख्या बाजूच्या प्रांतात. मधुचंद्राच्या आनंदभरांत कुंदेनें त्या पूर्वोक्त अवगुंठनवती प्रौढेजवळ कबूल केलें की पथिकाश्रमातील नोकर नुकताच नोकरीस लागला होता. आणि त्यानेंच त्या दोघांची गांठ मुद्दाम घालून दिली व जेथें तो जाईल तेथून प्रथम एक कार्ड टाकण्यास बजावलें होतें. परंतु तिनें गिरीवरून पत्र वगैरे मुळीच टाकलें नव्हतें. कुंदेला काय माहीत की आपली गांठ एका चलाख खिसे-कापूशी पडली आहे म्हणून ? आतां तर तिचा विवाह त्याच्याशीच झाल्यामुळे ती एखाद्या पतिव्रतेप्रमाणें मनोभावें त्याची सेवा करीत होती. अशा प्रकारें सहा महिने मोठ्या आनंदांत गेले. दिवसा दोघेहि छद्मवेषांत असत. कुंदा कामधामासाठी जरूरीपुरती बाहेर पडे. इतर वेळीं दोघेहि हिरव्यागार शैलशिखरावर हिंडत. कुंदेचें गायन श्रवणीय असल्यामुळें वेळ मोठा मजेंत जाई. इंग्रजी पत्रें वाचून त्यांची सुखानें कालक्रमणा होत असे. एके दिवशीं दोघेहि खूप लांब फिरावयास गेले होते. ते रात्रीं परत येऊन पाहतात तों अपार यात्रा लोटलेली. अमावास्येच्या काळोखांत आपल्याकडे कोणाचें लक्ष वेध-णार नाही असें वाटल्यावरून दोघे जण व्यंकटेशाच्या दर्शनास गेले. प्रदक्षिणेच्या वाटेवर एक व्यक्ति कुंदेकडे टवकारून पाहात होती. कुंदा चपापली. द्रुतगतीनें दोघांनींहि घर गांठलें. तेव्हां गोव्यांतल्या पथिकाश्रमांतल्या नोकराला पाहिल्याचा तिला भास झाला होता. दोघांनींहि घाईनें जेवण वगैरे आटोपून दुसरे दिवशीं गिरी सोडायची असें ठरविलें. जरा कांहीं कोठें खुट्ट झाले कीं, दोघांच्या आंगावर कांटा येई. अशिथिल परिरंभांत कुंदेला गाढ झोंप लागली होती. त्यानें हळूच पाऊल न वाजवितां कपडे एका बॅगमध्यें कोंबले. एक लठ्ठ पैशाचें पाकीट आपल्या बुरख्यात लपविलें

आणि चोरपावलांनीं मागच्या दारानें त्यानें डोंगर गांठला. यात्रेकरूंच्या धोपट मार्गानें न जातां अेकीकडे असलेल्या परंतु लांबच्या वाटेनें तो गिरीचा अुतार अुतरूं लागला.

* * *

भोळी बिचारी कुंदा ! तिच्या अुपयोगाकरिता ठेवलेल्या ५०० रुपयांच्या सहाय्यानें तिनें पुनः पणजी गांठली. अेक दिवस सकाळीं वर्तमानपत्र वाचीत असतां ती आश्चर्यानें थक्क झाली.

**गुप्त पोलिसांची शिताफी !!**

" लखनौच्या अमीनाबाद पार्कमध्यें अेका श्रीमंत संस्थानिकाला लुबाडून पळालेला खिसेकापू रामेश्वर येथें मोठ्या शिताफीनें पकडला. हेरानें गोव्यांत हस्तसामुद्रिकाचें सोंग घेअून त्याच्या हाताचा छाप घेतला. पण चोरानें झुकांड्या देत देत गिरी, गोकर्ण वगैरे मजला करीत करीत शेवटी रामेश्वर गांठला. तेथें त्याला मुद्देमालासह पकडण्यांत आलें. "

कुंदेनें एक दीर्घ निश्वास टाकून वर्तमान पत्र फेंकून दिलें.

(मनोरंजन, ऑगस्ट १९३४)

# १६

# घरजांवअी

**[ घरजांवयाला आपल्या पत्नीच्या साध्या वर्तनावरून सुद्धां संशय यावा हें साहजिकच आहे; पण या आत्म-कथेंतील संशयनिरसनाचा भाग मोठा मनोरंजक आहे. ]**

अन् पेमाच्या फंदांत पडण्याअितका मी श्रीमंतही नव्हतों. प्रेम, प्रणय, काव्य अन् रोमान्स ही रिकामटेकड्या श्रीमंतांची कामं ! बी. अे. झाल्यावर कुठंच नोकरी मिळेना म्हणून मी पोलिसखात्यांत शिरलो. माझी धडधाकट शरीरप्रकृति व कणखर बांधा मला तेथें फारच अुपयोगी पडली. अिन्स्पेक्टरची परीक्षा पास होतांच साहेबांनीं माझी खास शिफारस केली व हेड ऑफिसांत लावून घेतलें.

साहेबाचं माझ्यावर पितृतुल्य प्रेम. लहानपणापासून मी गरिबींत वाढल्यामुळ आतां अेक प्रकारचा मानी तुसडेपणा माझ्या अंगांत मुरला होता. पण साहेबांना माझ्याबद्दल कां बरं प्रेम वाटतं ? अन् प्रमिलाताअीही पण माझा कधी अनादर करीत नाहीत ! आपलं काम बरं आणि आपण बरं ही माझी वृत्ति साहेबांच्या घरांत चालेनाशी झाली. अधिकारी या नात्यानें साहेब माझ्याशीं कधीच वागले नाहीत. अेवढ्या शिकलेल्या व सुंदर प्रमिलाताअी, पण त्यांनाही माझ्याबद्दल आदर वाटतो. मी स्वभावानें लाजाळू होतों. अजूनसुद्धां मी स्नानसंध्या, नमस्कार कधीं चुकविले नाहींत याबद्दल साहेबांना कौतुक वाटे. मी काल रात्रीं माझा पाहणीचा राअूंड संपवून आलों, तेव्हां मध्यरात्र अुलटून गेली होती. साहेबांच्या

माडीवर अजून दिवा दिसत होता आणि आश्चर्याची गोष्ट कीं, सिनेमाशिवाय रात्रीं कधींही जागण न करणाऱ्या प्रमिलाताअी आज जाग्या होत्या. तावदानावर त्यांची पडलेली सावली व पाठीवर रुळणारा शेपटा दिसत होता. रेनकोट व्हरांड्यांत ठेवून बूट न वाजवितां मी हळूच माझ्या खोलींत गेलों. माझें दार वाजलेलें अैकून साहेब बाहेर आले आणि प्रमिलाताअीही जाग्यावरून अुठल्या असाव्या असें मला वाटलें. त्यांची स्प्रिंग कॉट करकरली.

'कां हो अुशीर लागला आज फार ?'

'नळ बाजारांत अेक दारुडा आपल्या बायकोला चोपीत होता म्हणून—'

'नेहमीचेच प्रकार आहेत. तिकडं जरा कानाडोळा करायला हवा.'

'पण ड्यूटी तर करायला पाहिजे ना ? '

'मग काय केलंत तुम्ही ?'

'त्याला चार श्रीमुखांत दिल्या व धुंदी अुतरल्यावर त्यानंच कबूल केलं, पुन्हां असं मारणार नाही बायकोला !'

'बरं, कपडे काढून या. जरा काम आहे थोडंसं ! प्रमा तूही ये.'

कपडे काढतांना मी विचार करूं लागलों की, साहेबांचें काय काम असावें ?

त्यांच्या खोलींत जाअून नेहमींप्रमाणें मी अुभा राहिलों.

'बसा, त्या कोचावर ! पमे, बैस त्या आरामखुर्चीवर. हें पाहा, आमची पमा तुम्हांला पसंत आहे कां ? ' या प्रश्नानें मी भांबावून गेलों. झोंपडीवर कोणीं सोन्याचा कळस ठेवला असता तरी मला जास्त आश्चर्य वाटलें नसतें ! बाहेर मुसळधार पाअूस पडत होता. पण माझें तोंड घामानें डबडबलें होतें. आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्याच्या अेकुलत्या अेक सुन्दर मुलीचा अभिलाष धरण्याअितका पागल मी खास नव्हतों. दगडानें फार झालें तर नक्षत्राकडे पहावें ! कुठें दगड आणि कुठें तारा ?

त्या वेळीं पमाताअी खालीं पाहात होत्या व त्यांचा चेहराही प्रफुल्ल होता. ' मौनं संमतिलक्षणम् ' या न्यायानें साहेबांनीं माझा होकार समजून पमाला विचारलें, ' पमा, हं तुझं मत सांग पाहूं ? '

पमानें अेकदां बापाकडे मान वर अुचलून पाहिलें आणि तिचीं बोटें पदराशीं खेळू लागलीं. कोणीच कांहीं बोलेना. बाहेर वीज कडकडत होती आणि माझ्या मनांत सुखाचा प्रकाश पडला होता !

मॅट्रिक–असिस्टंट मास्तराला, हेड मास्तराची जागा अनपेक्षित मिळावी, किंवा नव्या वकीलाला अचानक जज्ज नेमल्याची तार यावी, त्याप्रमाणें माझी स्थिति झाली. नवख्या लेखकाची लघुकथा संपादकानें छापावी आणि वर बिदागी द्यावी त्याप्रमाणें मला वाटलें. पमा काळीसांवळीच होती, पण फारच नखरेबाज होती. तिचा पोषाख टापटिपीचा पण मोहक होता. प्रवेशपरीक्षेपर्यंत इंग्रजी शिक्षण झाल्यावर आतां अेकदोन वर्षे ती घरीच होती. बॅडमिंग्टन व कॅरम खेळण्यांत ती प्रवीण होती, तशीच पेटी वाजविण्यांत कुशल होती. अितकेंच काय पण तिचें सुरेल गाणें अैकून मीसुद्धां पूर्वी तिची मनांतल्या मनांत तारीफ करीत होतों. ' क्वचित् गानी पतिव्रता ?' ही कल्पना माझ्या मनाला चाटून गेली. पण मी भावी सुखाचे मांडे मनांत खाअूं लागलों होतों. मोठ्या समारंभानें आमचें सुमुहूर्तावर लग्न झालें आणि वरदक्षणा म्हणून साहेबांनीं आपली सगळी अिस्टेट मला वुअिलमध्यें लिहून ठेवली. मी घरजांवअी झालों.

—२—

' सोड ना मला आतां वसंता ? पाहील कीं कुणी ! '

' आहे कोण पहायला घरांत ? तुझा नवरा ऑफिसांत गेलेला पाहूनच तर मी आलों ! बाबासाहेब तर परेडला गेले आहेत ना ? '

' जाअूं दे रे आतां ! अन् हें बघ, पुन्हां आतां यायचं नाहीं अंऽ! कधी तिकडं कळलं तर—'

' वा: अशी जुनी ओळख विसरून कसं बरं चालेल ? पमा, पण पैसे आणलेस कां ? '

' ह्या घे नोटा. पुन्हां पाऊल ठेवलंस तर पहा. जा बाबा आतां; कर काळं अेकदांचं ! अन् तें पत्र आजहि आणलं नाहींस ? '

दोन तोंडें अेकत्र मिळाल्यासारखा आवाज झाला.

भास असेल तो ! ती घामाघूम झाली होती आणि तो हंसतमुखानें बागेच्या फाटकांतून बाहेर पडला.

तांतडीनें दुपारच्या अेक्सप्रेसनें मला पुण्याला जाण्याचा हुकूम मिळाल्यामुळें मी घरीं अनपेक्षितपणें आलों होतों. पदर सांवरीत, केंसांवरून हात फिरवीत फिरवीत ती माझ्या खोलीवरून चालली होती. मी बॅगमध्यें कपडे भरीत होतों. ती मला पाहून फार दचकली आणि तिची कावरीबावरी झालेली मुद्रा पाहून माझें डोकें फिरूं लागलें व डोळे लाल झाले.

' कुठली तयारी चाललीय ? ' ती हंसून म्हणाली, ' आज शनवार लौकर सोडायची तयारी केली आहे. '

' अं ऽ ? मी पुण्याला जाऊन येतों ! ' मीं डोकें शांत ठेवून अुत्तर दिलें. ' अुद्यां येअीन संध्याकाळीं ! '

' पुण्याला ? कां ? '

' काम आहे सरकारी ! ' मीं बाहेर पाहिलें तों मोटार दारांत अुभी होती. मी बॅग घेअून खालीं निघालों. तिनें बटनहोलला अेक गुलाबाचें फूल लावीत म्हटलें, ' लौकर यावं गडे! मला करमत नाहीं अेकटीला ! '

' बरं ! ' असें म्हणून मी खालीं आलों. मोटारींत बसतांच फूल काढून चुरगाळन फेंकून दिलें.

ती माडीवरील सज्जांत अुभीच होती. बाहेरून शांतपणा धारण केला होता तरी आंत आग धडाडली होती. चेहरा निर्विकार ठेवला असला तरी मन मात्र भडकलें होतें. माझ्या बढतीची प्रगति या

पुण्याच्या कामावर अवलंबून होती. त्यामुळें नाअिलाज होअून जावें लागलें. जसें होअील तसें काम आंवरून मी परत मुंबअीस आलों. तेव्हां बाबासाहेब नेहमींप्रमाणें ज्ञानेश्वरी वाचीत बसले होते व माझी पत्नी माझ्या वाटेकडे डोळे लावून बसली होती. रोजरोजची तिची माझ्याबद्दलची आस्था पाहून मला त्वेष आला. काय हा देखावा ! काय नाटक हें ? याचा अेकदां सोक्षमोक्ष करून टाकावा असें मला वाटलें. टाअिम्सचा अंक हातांत घेतला. पण अेक अक्षरहि कळेना. आजच्या विचारांत 'Haste is waste' ही अक्षरें वाचलीं.अंक फेंकून देअून फेऱ्या घालू लागलों. माझा अेक सहाध्यायी नुकताच वकील झाला होता. तो भेटावयास आला. त्याच्या जवळ बाहेर जाअून मनाची तळमळ सांगितली. त्यानें सांगितलें, ' Marry in haste and repent at leisure! ' हें जरी खरें असलें, तरी शांतपणेंच पाअूल पुढें टाकावें. पमावहिनीकडे कदाचित् चूक नसेलहि. तूं शांत रहा. मी या प्रकरणाचा छडा लावतों. जर त्यांचा अपराध असला तर काय करायचं तें पाहूं. पण तोपर्यंत त्यांना थांग लागूं देअूं नकोस. मी घरांत पाअूल ठेवलें, तोंच ती धांवत धांवत खोलीत आली.

' आज सिनेमाला जाअूं या कां ? ' स्वर्गीय संगीत ' 'Song of Songs ' ही फिल्म् आहे. मार्लिन डिट्रिचची. ' आम्ही तिघेंहि सिनेमाला गेलों.

समोरच्या बॉक्समध्यें बसलेला अेक अैटबाज तरुण तिच्याकडें टक लावून पाहात होता. दोघांची नजरानजर होतांच तिनें त्याच्याकडे पाठ करून माझ्याशीं लडिवाळपणें भाषण सुरू केलें. मीं माझ्या मित्राला सुनविलें, 'तो तरुणच आमच्या घरांत आला होता'. माझा मित्र जागेवरून अुठला व आम्ही सिनेमा पाहण्यांत मग्न झालों. माझ्या पत्नीचें वर्तन दिसायला तर अत्यंत प्रेमळपणाचें व शुद्ध होतें.

पण 'चक्षुर्वै सत्यं' गोष्ट ही खोटी कशी म्हणावी ? अशा स्थितीत कांहीं दिवस गेले. माझी पत्नी मातृपदावर आरूढ होण्याची चिन्हें दिसूं लागलीं.

—३—

'नमस्कार, फौजदार साहेब !' वांद्रा फास्ट लोकलमध्यें या अनपेक्षित नमस्कारानें मी फार चपापलों. बोरिवलीस झालेल्या अेका चोरीचा तपास लावण्याचें काम मला सांगितलें होतें. गुप्त पोलिस खात्यांत माझी बढतीवर नेमणूक झाली होती आणि मी मात्र साध्या वेषांतही ओळखून काढणारा हा नमस्कार असल्यामुळें चपापलों. पण प्रसंगावधान राखून मीं अुलट नमस्कार केला नाही- तो माझ्याकडे पाहून हंसला. गाडी सांताक्रूझला थांबली. मी वर्तमान-पत्र वाचण्यांत गुग आहें असें दाखवीत असलों तरी मभोंवार मी न्याहाळून पाहात होतों. गाडी सुरू झाल्यावर दाढीवरून हात फिरवीत तो म्हणाला:

'अिकडे कुणीकडे ? 'मी स्तब्धच होतों.

'मीं आपणास ओळखलें. रावसाहेबांचे आपण जांवअी नव्हे कां ?' त्यानें आपली फेझ टोपी हातांत घेअून म्हटलें.

'नाहीं. माझी आपली ओळख नाहीं ! मी अुत्तर केलें. तो हंसत हंसत बाहेर पाहूं लागला. तो पार्ल्याला अुतरला. मी सरळ बोरि-वलीस गेलों. ज्याच्या घरापाशी चोरी झाली होती तो अेक श्रीमंत व्यापारी होता. तो सुशिक्षित तरुण होता. आणि चोरानें पैशाला किंवा दागिन्यांना हातही लावला नव्हता. फक्त कांहीं महत्त्वाचे कागदपत्र चोरीस गेले होते. नव्यानेंच नोकरीला ठेवलेल्या तरुण मास्तरणीचा मला संशय आला. मुलांमुलींना इंग्रजी, गणित शिक-वणें आणि गाणें, विणकाम वगैरे करून घेणें हेंच तिचें काम होतें. तिच्यावर पाळत ठेवण्याचें ठरवून मी तेथून निसटलों. उद्यां रविवार,